श्रीरामप्रसन्न.

# श्रीराम आणि रावण.

## ( पौराणिक कादंबरी. )

---

॥ आबाल वृद्ध रघुनायक कीर्ति गाती ॥
॥ ज्याचे अपार गुण कल्पतरूच होती ॥
॥ त्या वर्णितां किमपि दोष नसे कवीचा ॥
॥ जें चांगलें अनुसरेल तिथेंच वाचा ॥ १ ॥

( आनंदतनय. )

जगदे शकापूर्वी फार प्राचीनकाळीं शरयूनदीतीरीं कोसल अयोध्या नगरींत सूर्यवंशीय सार्वभौम दशरथ राजा राज्य करीत असे. त्याच्या राज्याची रचना व लोकस्थिति स्तुतिपात्र होती. राजमार्ग स्वच्छ व शोभिवंत होते. त्यांवर सुगंधाचे सडे घालून ते प्रशांत ठेवीत. व्यापाराची सोय चांगली असल्याकारणानें, अनेक देशांतील लोक अयोध्येंत व्यापाराकरितां जमत. खंडणी देण्याकरितां व इतर राजकीय कामासाठीं आलेल्या मांडलिक राजांची शहरांत फार दाटी असे. इंद्रलोकांतील विमानाप्रमाणें मोठमोठे महाल व वाडे आकाशाशीं स्पर्धा करीत आहेत, असें दिसे. जिकडे तिकडे शांतता होती. अन्यायाचें व अव्यवस्थेचें सर्व राज्यांत नांवही ऐकूं येत नव्हतें. राजा, पुत्राप्रमाणें

प्रजेचें पालन करी. प्रजा, स्वराजभक्त, स्वदेशाभिमानी, सन्मार्गवर्ती व वेदपारंगत ब्राह्मणांस अत्यंत सन्मान देत असे. सर्व लोक सौख्यानंदांत व ईश्वराचें भजन-पूजन करण्यांत काळ कंठीत. ते उदार, कृतज्ञ, दीर्घायुषी व संतती-संपत्ति-संपन्न होते. जिकडे तिकडे सौख्याचा पूर निघत होता. दारिद्र्य कशाला ह्मणतात, हेंही कित्येकांस माहीत नव्हतें.

**दशरथ** राजाचें सर्व सैन्य सशक्त, वीरश्रीयुक्त, समयज्ञ, स्वकार्यदक्ष, स्वामिसेवातत्पर, विश्वासुक व युद्धकलाप्रवीण होतें. शत्रूपासून स्वराज्यास अपाय होऊं नये व प्रजेचें सुसंरक्षण व्हावें, एतदर्थ शहरासभोंवार सजवून किल्ले बांधिले होते. त्यांवर चांगल्या व्यवस्थेनें उल्हाट यंत्राची ( तोफा ) रचना केली होती. **दशरथ** राजा राजप्रजाहितांत फार दक्ष, न्यायी, ससंयम व पोक्तविचारी होता. तो मानसविचारप्रकृतीनें चांगला होता. त्याचे अष्टप्रधान विद्वान, धैर्यसंपन्न, स्वकार्यतत्पर, परहितदक्ष, चतुर, विवेकी, सदसद्विचारी व न्यायी होते. कोणीच स्त्रीलंपट, दुष्ट किंवा मिथ्याभाषणी नव्हता. भांडागार विपुल संपत्तीनें भरलेलें होतें.

कुलगुरु **वसिष्ठास दशरथ** फार सन्मान देई. राजाचा कोणताच शत्रु नव्हता. यामुळें प्रजाहिताकडे, दानधर्माकडे व परमेश्वरप्राप्त्यर्थ अनेक सत्कृत्यें करण्यांत तो सदैव निमग्न होता. **दशरथाच्या कौसल्या, सुमित्रा व कैकयी** अशा तीन पट्टराण्या होत्या. त्याला **जरी सर्व सुखें** अनुकूल होतीं, तरी पोटीं पुत्रसंतान

नसल्याकारणानें तो फार चिंतामग्न असे. निर्जल सरोवरापासून जसा तृषार्तास मुळींच उपयोग होत नाहीं. त्याप्रमाणें पुनाम नरकांतून आपलें तारण करण्यास पुत्रसंतान नसल्यामुळें तो नेहमीं औदासिन्यानें घेरलेला व खिन्नमन दिसे. आणि त्यावेळीं सर्व लोकही ज्याला पुत्र नाहीं तो प्रतिष्ठाहीन, अयोग्य व शून्या प्रमाणें समजत. दशरथानें पुत्रप्राप्त्यर्थ पुष्कळ दान, धर्म, उपवास व तपाचरण केलें; परंतु व्यर्थ. आपली आशा सफल व्हावी, आपणास पुत्र व्हावा, आपल्या बल सौख्य कीर्तीचा विस्तार व्हावा; आणि सहज स्वर्गादि सुखप्राप्ति व्हावी, असें मनांत आणून राजानें मोठ्या थाटमाटानें व यथाविधि अश्वमेध केला. नंतर अंगदेशीय ऋष्यशृंग मुनिवरास मान देऊन दशरथानें पुत्रकामेष्टीही केली. त्यावेळीं विष्णु व ब्रह्मा प्रभृति सर्व देव अदृश्यरूपानें तेथें आले होते.

त्या काळीं ब्रह्मदेवानें विष्णूस सांगितलें " माझ्या वरप्रदानानें राक्षसराज रावण अत्यंत उन्मत्त झाला आहे. तो सर्व लोकांस फार फार दुःख देत असतो. पृथ्वीवरील धर्मसंस्थेचा त्यानें उच्छेद मांडिला. इंद्रपद घ्यावें अशी त्याची उत्कटेच्छा दिसते. माझ्या वरप्रदानामुळें देव करून त्याचा वध होणार नाहीं. एतदर्थ तूं दशरथाच्या तीनही स्त्रियांच्या उदरीं मनुष्यरूपानें अवतरशील, तर रावणाचा सहज लीलेनें नाश करशील. तुला सहाय व्हावें याकरितां माझ्या आज्ञेनें बहुतेक देवता, वानर, रीस व नळनीळादि रूपानें पृथ्वीवर अवतरल्या आहेत. तूं इतकी कृपा करशील

तर **दशरथाचा** हेतु सफल होऊन **रावणाचा** संहार होईल; आणि देव व मानवही संकटांतून मुक्त होतील. "

**विष्णूनें ब्रह्मदेवाच्या** विनंतीचा अंगिकार केला. तितक्यांत यज्ञकुंडांतून दिव्यदेही व वस्त्रभूषण भूषनें परिशोभित असा एक अलौकिक पुरुष उत्पन्न झाला. त्याच्या सुंदर हस्तांत अमृतसदृश क्षीरीचा एक कलश होता. तो त्यानें **दशरथ** राजास देऊन सांगितलें " राजा, तुझ्या मुख्य तीन स्त्रियांस ही क्षीर दे म्हणजे तुला पुत्रसंतती होईल. "

**दशरथानें** त्या दिव्य पुरुषास संभ्रमभावानें वंदन करून कलश घेतला. इतक्यांत तो दिव्य पुरुष अंतर्हित झाला.

यज्ञसमारंभास एक वर्ष झाल्यानंतर चैत्र शुद्ध ९ स **कौसल्येच्या** उदरीं **श्रीराम** अवतरले. दुसरे दिवशीं **कैकयीस भरत** आणि **सुमित्रेस लक्ष्मण** व **शत्रुघ्न** असे दोन पुत्र झाले. तेव्हां **अयोध्या** नगरी आनंदातिशयानें गजबजूं लागली. **दशरथाच्या** व त्याच्या स्त्रियांच्या आनंदसागरास तर सीमाच राहिली नाहीं. गंधर्व, गायन करूं लागले. अप्सरांनीं नृत्य आरंभिलें. देवता दुंदुभि वाजवूं लागल्या. आकाशांतून पुष्पवृष्टि होऊं लागली. **दशरथानें अयोध्या** नगरी श्रृंगारिली. हत्तीवरून शर्करा वांटली. पुष्कळच दान धर्म केला; आणि समारंभानें मुलांचा जातकर्मसंस्कार केला.

चाऱ्ही सुकुमार दिवसेंदिवस वाढूं लागले. तेव्हां तर मातापितरांच्या अत्यानंदास सीमाच नाहींशी होत **चालली. पुत्रांच्या बाललीला पाहून तीं आपणांस धन्यता मानूं लागलीं. लहानपणापासूनच श्रीरामावर**

लक्ष्मण अतिशय प्रीति करी. **भरताचें** व **शत्रुघ्नाचें**-ही फार सख्यत्व होतें. सारांश. ते चारी बंधु परस्परांशी बंधुप्रीतीनें वागत.

एकदां **दशरथ** राजा पुत्रांच्या विवाहविचारांत होता. तितक्यांत '**विश्वामित्र** ऋषी भेटीची इच्छा करीत आहे' असें द्वारपाळानें येऊन राजास सांगतांच तो **वसिष्ठादि** महाजनांसह **विश्वामित्रास** सादर व प्रेमपूर्वक भेटला. परस्परांचें क्षेम कुशल झाल्यानंतर **दशरथ** म्हणाला. "**विश्वामित्र** ऋषी. आपल्या दर्शनानें मला फार आनंद झाला. माझें पूर्वपुण्य सबळ म्हणून हे पाय माझ्या घरीं लागून माझें जीवन साफल्य झालें. आपण आपल्या तपसामर्थ्यानें राजर्षीचे ब्रह्मर्षि झालां. आपण त्रैलोक्यांत धन्य आहां. [illegible] आज माझा देश व गृह परम पवित्र झालें. आपली जी इच्छा असेल ती निवेदन करा. दासानुदास सेवेस सादर सिद्ध आहे."

**विश्वामित्रानें** सांगितलें "राजा. तूं इक्ष्वाकुवंशोत्पन्न. तशांत **वसिष्ठ** मुनींचा पट्टशिष्य. तूं आपल्या वचनास कधीं ढळणार नाहीस हें मी पूर्णपणें जाणतों. असो. मी दीक्षा घेऊन ज्या ज्या यज्ञास आरंभ करितों. त्यास **मारीच** व **सुबाहु** ह्या नांवांचे दुष्ट राक्षस प्रत्येक वेळीं अमंगळ व अपवित्र पदार्थ टाकून विघ्न आणितात. यज्ञवेदी दूषित झाली कीं. माझा निरुत्साह होतो; आणि तें स्थळ सोडून दुसरीकडे जावें लागतें. मी त्या दुर्मतीस शाप देऊन भस्म करण्यास समर्थ आहें; परंतु यज्ञप्रसंगीं शास्त्र-मर्यादेचें उल्लंघन करणें अयोग्य. इतक्याकरितांच मीं आजपर्यंत त्या पापमूर्तींकडे अलक्ष्य केलें; परंतु आतां

त्या पापिष्टांच्या त्रासदायक कर्मास सीमाच राहिली नाहीं. राजा, तूं श्रीरामास यज्ञसंरक्षणार्थ देशील तर मी फार आभारी होईन. यज्ञसमाप्तीस फार तर दहा दिवस लागतील. तुला पुत्रवियोगजन्य दुःख फार दिवस सहन करावें लागेल, असा अर्थ नाहीं. श्रीरामाचा शौर्यादि प्रभाव मला माहीत आहे. तुझ्यासारख्या सुज्ञ राजास मी फार सांगावयाच नकोच."

हे ... ऐकतांच दशरथ राजास आज आपल्या वर अ... ... कोसळलें असें भासलें. भीतीनें त्याचें अंग कांपू लाग... व दुःखातिशयानें तो मूर्छित पडला. त्याची मूर्छा गेल्यानंतर तो पुनः सावध झाला व म्हणूं लागला "ऋषिराज, माझ्या श्रीरामास अद्याप पंधर वर्षें झालीं नाहींत; आणि अशा कोणच्या राक्षसांचा संहार करावयास त्यास सांगतां. तो सुकुमार बाळ व भयंकर राक्षसांचा नाश कसा करील? आपली इच्छा असेल तर, मी एक अक्षौहिणी सेना घेऊन यज्ञसंरक्षणास येतो; परंतु कृपाकरून श्रीरामास नेऊं नका. आणि त्याला न्यावेंच असा दुराग्रह असेल तर त्याच्या बरोबर मीही येतो."

विश्वामित्र शांततेनें म्हणाला "राजा, पुलस्त्य मुनीचा पुत्र जो विश्रवा त्याचा पुत्र रावण, ब्रह्मदेवाच्या वरप्रसादानें फार माजला आहे. तो त्रैलोक्यपीडक रावण आणि त्याचे अगणित अनुचर माझ्या यज्ञकर्मांत विघ्न आणितात. त्यांत मारीच आणि सुबाहु ह्यांच्या अनिवार दुःखानें मी फार त्रासलों; आणि त्याच त्रासामुळें येथें

आलों आहें. तूं आपलें वचन मनांत आण आणि **श्रीरामास** मजबरोबर पाठीव. मी त्याचें कल्याण करीन.

**दशरथानें** स्वमनाशींच पुष्कळ विचार केला. तो दीनासारखा ऋषींकडे पाहून ह्मणाला " अशा **प्रबल** पराक्रमी व मायावी राक्षसांबरोबर युद्ध करून माझ्या श्रीरामाचें कसें रक्षण होईल. मजवर कृपा करा; आणि मला तुम्ही **श्रीराम** दान द्या."

**विश्वामित्रास** फार वाईट वाटलें. आपण इतक्या आग्रहानें मागितलें तरी **दशरथाला** मायामोह सुटत नाहीं. असें पाहून **विश्वामित्र** ह्मणाला " तूं वचनभंग दोषांत पडणार नाहींस असें मला मनःपूर्वक आशा होती. असो. तशी इच्छा. मी जसा आलों तसाच जाईन. तूं सुखी रहा ह्मणजे झालें."

प्रचंड क्रोधी **विश्वामित्र** बोलता बोलतां उठून जाऊं लागला. तेव्हां **वसिष्ठानें दशरथास** सांगितलें " तूं इक्ष्वाकुकुलोत्पन्न राजा आहेस. तुझ्यासारखा न्यायी व धर्मात्मा राजा जगांत विरळा. जो पुरुष वचन देऊन किंवा प्रतिज्ञा करून तिचा भंग करितो, त्याचें दान, धर्म, तप व व्रत व्यर्थ जातें. असें मी तुला कित्येक वेळां सांगितलें असेल. तूं पुत्रप्रेमानें परिबद्ध झालास ह्मणून तें तुझ्या लक्ष्यांत येवो अथवा न येवो, मी हें विश्वासानें सांगतों. **श्रीराम** शस्त्रास्त्रविद्याविशारद असो किंवा नसो; परंतु **विश्वामित्राच्या** यज्ञाचें संरक्षण करील ह्यांत अगदीं संशय नाहीं. तपविद्या धर्मबलांत आज **विश्वामित्राच्या बरोबरीचा कोणीच नाहीं. त्याला वाईट वाटूं देणें किंवा त्वेष आणणें तुला अनुचित.**

विश्वामित्रास सर्व शस्त्रास्त्रविद्या चांगली अवगत आहे; आणि नवीन शस्त्रें उत्पन्न करण्याचीही त्याच्या अंगीं अद्भुत शक्ति आहे. तो एका क्षणांत सर्व दुष्ट निशाचरांचा संहार करील; परंतु केवळ तुझें हित व्हावें एतदर्थ तो तुजकडे आला. तूं मोहाचा त्याग कर आणि श्रीरामास विश्वामित्राच्या स्वाधीन कर."

वसिष्ठाचें निस्पृही व दूरदर्शी भाषण ऐकून राजाचा परिताप नाहींसा झाला; आणि विश्वामित्राचा-ही त्याचा दृढ विश्वास बसला. त्यानें श्रीराम व लक्ष्मण ह्यांस आशिर्वाद देऊन प्रसन्नमनानें व शांत अंतःकरणानें विश्वामित्राच्या स्वाधीन केलें.

विश्वामित्र अत्यानंदभरित झाला व श्रीराम-लक्ष्मणास घेऊन निघाला. जातां जातां त्यानें त्यांस बला व अतिबला ह्या विद्यांचा मंत्ररूपानें उपदेश केला. तेव्हां ते दोघे बंधु सूर्यासारखे तेजस्वी दिसूं लागले. त्यांस मार्गांतील श्रमानें मुळींच दुःख आलें नाहीं. पहिल्या दिवशीं ते त्रिवर्ग शरयु नदीच्या कांठीच राहिले. दुसरे दिवशीं कामदेवाच्या आश्रमीं राहून तिसरे दिवशीं ते एका निबिड वनांत येऊन पोंचले. वाटेंत श्रीराम व लक्ष्मण विश्वामित्राची श्रद्धा-भक्तीनें सेवा करीत. ते त्यास अनेक वृत्तांत विचारीत व अपूर्व चित्रविचित्र शोभा पहात भयंकर जंगलांत आल्यावर त्यांस फार आश्चर्य दिसलें. तेव्हां श्रीरामानें विश्वामित्रास विचारिलें 'काय हें भयानक निबिड वन!' विश्वामित्रानें सांगितलें "श्रीरामा. येथें पूर्वी मलद व करुप ह्या नांवाचे दोन समृद्धिमान देश होते; ते

मार्गांत माता ताटिका हिनें उजाड पाडिलें. ती येथून जवळच रहाते. तिला दहासहस्र हत्तींचें बळ आहे. तुझ्या-शिवाय तिचा नाश कोणाच्यानेंच होऊन होणार नाहीं. तुला समयीं शंका वाटेल कीं, आपण स्त्रीहत्या कशी करूं? परंतु तुझी ही आशंका निरर्थक आहे. कारण, प्रजारक्षणार्थ कोणतेंही काम करण्यास राजास किंवा राजकुमारास अगदीं दोष लागत नाहीं. पूर्वी भृगूच्या स्त्रीस विष्णूनें व विरोचनकन्येस इंद्रानेंही मारिलें होतें. असें असतांही जर तुझ्या मनाचें समाधान होत नसेल, तर पित्याच्या आज्ञेप्रमाणें परशुरामानें स्वमातेचा वध केला. परंतु परशुरामास मुळींच दोष लागला नाहीं. हा विचार लक्षांत आण व माझ्या आज्ञेप्रमाणें तूं त्या राक्षसीचा निःशंक वध कर."

"आपली आज्ञा शिरसावंद्य करा, असें आह्मांस पित्यानें निक्षून सांगितलें आहे. तशांत गोब्राह्मणरक्षण व स्वदेशहित करणें हा आमचा धर्मच आहे. ती दुष्ट राक्षसी पुढें तरी येऊंद्या. मी तिचा पहिल्यानें सपाट्यास वध करितों" असें सांगून श्रीरामानें गगन-मंडल परिकंपित करणारा परम भयंकर धनुष्यटणत्कार केला. त्याबरोबर दशदिशांचा थरकांप झाला. जंगला-तील पशुपक्ष्यादि श्वापदांची गाळण झाली. आणि क्रोधोन्मत्त व परम भयानकस्वरूप ताटिका ही अकाळ विक्राळ ओरडत तेथें आली. तेव्हां लक्ष्मण ह्मणाला "श्रीरामा, ही मायावी राक्षसी सनकडेच येत आहे. ह्या अबलेस ठार मारणें अनुचित. मी हिचें नाक व कान कापून हिला निर्वीर्य करितों."

इतक्यांत ताटिका श्रीरामाच्या अंगावर धांवली. तिच्या दारुण किंकाळ्यांनीं भूकंपाचा भास होऊं लागला. मेघमालेप्रमाणें क्षणांत तिनें आपला देह विस्तीर्ण केला. ती श्रीराम, लक्ष्मण व विश्वामित्र यांवर अजस्र शिलांचा वर्षाव करूं लागली; परंतु श्रीरामानें चपलता करून एक बाण सोडतांच शिलावर्षावाचा परिहार व ताटिकेच्या दोन्ही हस्तांचें एकदमच छेदन झालें. लक्ष्मणानेंही तिचें नाक व कान कापले. दोघांही बंधूंचें शौर्य, धैर्य, पराक्रम, चपलता व युद्धनैपुण्य पाहून विश्वामित्रास फार आनंद झाला. त्यानें त्यांस आशीर्वाद दिला; आणि सांगितलें "सायंकाळीं राक्षस बलवत्तर होतात. आतां विलंब करूं नका. निशाचरीला सत्वर ठार मारा."

श्रीरामानें तत्क्षणींच शब्दवेधी क्रियेचा अनुभव पहाण्याकरितां आकाशांत एक बाण सोडिला त्यासरशींच ताटिका इहलोकाचा त्याग करून धाडकन् भूमीवर पडली. तेव्हां विश्वामित्र श्रीराम लक्ष्मणास धन्यता देऊं लागला. आणि आकाशांतून सुगंध सुमनांचा देवादिकांनीं श्रीराम लक्ष्मणावर वर्षाव केला.

निबिड वनांतून दुसरे दिवशीं ते निघाले. मार्गांत विश्वामित्रानें श्रीराम लक्ष्मणास ब्रह्मास्त्र, पिनाकास्त्र, नारायणास्त्र इत्यादि पुष्कळ अस्त्रांची व कौमुदकी, गदा इत्यादि शस्त्रांची विद्या शिकविली. नंतर ते वनशोभा पहात व पुष्कळ मनोरम वृत्तांत श्रवण करीत सिद्धाश्रमीं आले. त्या आश्रमांतील तापसी जनांनीं

त्यांचा चांगला गौरव केला. त्याचें मन शांत झालें. "श्रीराम लक्ष्मणास ऋषिराजांनें आणिलें, आतां आपलें यज्ञकर्म निर्विघ्न सिद्ध होतें." असें मनांत येतांच त्यांचीं मुखकमलें प्रफुल्लीत दिसूं लागलीं. आणि अशा प्रकारच्या अनेक आनंदलहरी त्यांच्या मनांत उचं-बळून आहेत तोंच श्रीराम विश्वामित्रास ह्मणाला " महामुनि. आपण आताच यज्ञदीक्षा घ्या. समयीं मारीच प्रभृति दुष्ट रात्रिचर आले तरी आह्मीं त्यांचा क्षणांत निःपात करूं."

विश्वामित्रानें त्याच दिवशीं यज्ञदीक्षा घेऊन मौन्यव्रत धरिलें. तेव्हां सिद्धाश्रमांतील मुनिजनांनीं श्रीराम-लक्ष्मणास सांगितलें कीं, "आतांपासून सहा दिवस आपले गुरुवर्य बोलणार नाहींत. तुम्हीं सावधपणानें रहा व तपोवनाचें रक्षण करा."

पांच दिवस तेथें कांहीं गडबड नव्हती; परंतु सहावे दिवशीं उत्पात चिन्हें होऊं लागलीं; आणि लोकरच कित्येक राक्षस आले. ते यज्ञवेदीवरील दर्भाची भस्म वस्था करूं लागले. आकाशांत घनघोर शब्द होऊं लागला. रक्तवृष्टीस प्रारंभ झाला. मारीच आणि सुबाहु दृष्टीस पडले, त्याबरोबर श्रीरामानें मानवास्त्रप्रयोग करून मारीचास समुद्रकांठीं भुगारून दिलें व आग्नेयास्त्रानें सुबाहूस तेथच्यातेथेंच गतप्राण केलें.

यथासांग यज्ञक्रिया करून विश्वामित्र कृतार्थ झाला. नंतर श्रीराम-लक्ष्मणास बरोबर घेऊन तो मिथिला नगरीस गेला. कारण, जनक राजानें त्याला यज्ञसमा-रंभास अत्याग्रहानें निमंत्रण दिलें होतें. आणि यज्ञानंतर

तो जानकी नामक प्रियकन्येचें स्वयंवरही करणार होता. आपण श्रीराम लक्ष्मणास बरोबर घेऊन मिथिलेस गेलों तर तेन्हीं कार्यभाग साधतील, असा त्याचा उद्देश होता. तो आपल्याबरोबर कित्येक ऋषी, मुनी व तापसजन घेऊन सिद्धाश्रमांतून निघाला आणि शोण व गंगानदीतीरांची शोभा पहात स्नान तर्पणादि अनेक सत्क्रिया करीत व प्रत्येक तीर्थांचें, नदींचें, वनोपवनांचें व धर्मक्षेत्राचें महात्म्य व वृत्तांत सांगत विशाला नगरींत येऊन पोंचला. तेथें इक्ष्वाकु वंशीय सुमति राजा राज्य करीत होता. त्यानें विश्वामित्र प्रभृतिंचा सत्कारानें गौरव केला. दुसरे दिवशीं श्रीराम लक्ष्मणासह मिथिलेंत आला. तेथील एका जीर्णाश्रमाचें कारण श्रीरामानें विश्वामित्रास विचारिलें. तेव्हां ऋषिवर्य म्हणाले " श्रीरामा, ह्या आश्रमांत पूर्वी अहिल्यापति गौतममुनि तपश्चर्या करीत असे. एकदां गौतम आश्रमांत नाहीं अशी संधि पाहून इंद्र, गौतम रुपानें तेथें आला व अहिल्येस मागूं लागला कीं, ज्या पुरुषास भोगेच्छा झाली, तो शास्त्रांत सांगितलेल्या ऋतु-कालाची वाट पहात बसत नाहीं. मला आतां तुझ्या समा-गमाची इच्छा आहे. "

अहिल्येनें इंद्रास ओळखिलें; परंतु दिव्य पुरुषाशीं समागम करण्याच्या दुष्टेच्छेनें तिनें इंद्राचें मागणें मान्य करून नंतर इंद्रास सांगितलें कीं, 'आज मी कृतार्थ झालें. आतां तूं आश्रमांतून जाशील तर बरें." अहिल्ये-च्या वचनास मान देऊन इंद्र निघाला, तोंच गौतम स्नान करून समिधा कुश, पुष्पादि घेऊन आला. त्यांनी

परस्परांस पहातांच **इंद्राची** मुखश्री कोमेजली. अंतर्ज्ञा-नानें **गौतमास इंद्राचें** निंद्य कर्म समजलें. तेव्हां त्याच्या दुराचरणानें **गौतमास** फार खेद झाला व त्वेषही आला. त्यानें क्रोधाच्या आवेशांत **इंद्रास**, " सहस्र भगांकित होशील " व स्त्रीस, " शिला होशील " असा शाप दिला आणि तो स्वतः निःसंग होऊन हिमालयांत तपश्चर्या करीत बसला. **श्रीरामा**, तुझी इच्छा असेल तर आपण आश्रमांत जाऊं व शिला होऊन पडलेल्या **अहिल्येस** पाहूं. "

ते आश्रमांत गेले. **श्रीरामाच्या** चरणरजानें **अहिल्येचा** उद्धार होऊन, ती पूर्ववत देवांगना झाली. तेव्हां **श्रीराम लक्ष्मणानें** तिला वंदन केलें. **अहि-ल्येनें** सर्वांचा अतिथ्य सत्कार अत्यानंदानें केला. आपला आश्रम **श्रीरामपदरजानें** पुनित झाला व **अहिल्या** शापनिर्मुक्त झाली, असें समजतांच, **गौतमही** तेथें आला व त्यानें **अहिल्येचा** पुनः स्वीकार केला.

**विश्वामित्र** येत आहे, असें **जनकास** समजतांच तो त्यास सामोरा गेला आणि महान सन्मानानें व आदरा-तिथ्यानें त्यानें त्यास यज्ञमंडपी आणिलें. **श्रीराम-लक्ष्मणास** पाहतांच **जनकाच्या** नेत्रीं आनंदाश्रु आले. त्यानें प्रेमवात्सल्यानें **विश्वामित्रास** ' हे कोण ' असा प्रश्न केला. तेव्हां **विश्वामित्रानें** त्यांचें सवि-स्तर चरित्र सांगितलें. तें ऐकून **जनक** हर्षभरित झाला आणि प्रसन्नमनानें त्यांची प्रशंसा करूं लागला.

यज्ञ-समारंभ-दर्शनेच्छेनें व **जानकीच्या** लालसेनें

अनेक ऋषि, मुनि, ब्राह्मण व सामंतादिक कित्येक राजे एकत्र जमले होते. जिकडे तिकडे लोकांची गर्दी उसळली होती. जो तो स्वयंवरमंडपांत **जानकी** आपल्यास कशी मिळेल? ह्या विचारांत होता. इतक्यांत **जनकानें** आपल्याकडे वंशपरंपरागत आलेलें **सदाशिवाचें पिनाक धनुष्य** आणवून सभेंत ठेविलें आणि सांगितलें " जो वीर पुरुष ह्या धनुष्यास दोरी चढवील, त्यास **जानकी** द्यावी, असी माझी प्रतिज्ञा आहे."

शेकडों राजपुत्र **जानकीच्या** आशेनें उठून धनुष्याजवळ गेले, त्यांनी आपली सर्व शक्ति खर्च केली; परंतु काहींच उपयोग झाला नाहीं. त्यांचा भर सभेत अपमान होऊन त्यास खाली मान करावी लागली. तेव्हां **जनक** क्रोधानें ह्मणाला "धनुष्यास दोरी चढविणें दूरच राहिलें, पण तें कोणी उचलण्यासही समर्थ नाहीं. आज सर्व लोक निर्वीर्य झाले काय! "

असें भाषण एकतांच **लक्ष्मणाचे** नेत्र आरक्त झाले, ओंठ स्फुरण पावूं लागले, भृकुटी वक्र झाल्या आणि संतापानें तो आरक्त झाला. परंतु **श्रीरामाच्या** भीतीनें तो बराच वेळ शांत होता. शेवटीं त्याच्यानें रहावेना. तेव्हां त्यानें सांगितलें "**श्रीरामा**, तूं आज्ञा देशील तर मी आतांच या धनुष्याचा चुराडा करून टाकीन."

**तितक्यांत विश्वामित्रानें श्रीरामास** उठण्याची **सूचना केली. तेव्हां श्रीराम** धनुष्यापाशीं गेला आणि **त्यानें सहज त्यास दोरी चढविली. जानकीनें श्रीरामाच्या कंठांत वरमाला समर्पण केली. जनकास अत्यानंद झाला. श्रीरामानें अद्भुत व अतार्कित कृत्य**

केलें. असें ह्मणून सकल लोक धन्यता देऊं लागले. **जनकानें दशरथास** निमंत्रण पाठवून आणविलें. तेव्हां **श्रीराम-लक्ष्मणांचा** अलौकिक प्रभाव पहातांच तोही आनंदभरित झाला. **जनकानें** मोठ्या थाटमाटानें विवाहसमारंभ केला. **श्रीरामास जानकी** व **लक्ष्मणास उर्मिला** नामक त्याचीच एक कन्या होती, ती दिली आणि त्याच्या बंधूच्या **मांडवी** व **श्रुतकीर्ति** नामक दोन कन्या होत्या, त्या अनुक्रमें **भरत** व **शत्रुघ्न** ह्यांस दिल्या.

विवाहोत्सव यथाविधि समाप्त होतांच **विश्वामित्र** तपास **हिमालयांत** गेला. **दशरथही राम लक्ष्मणांसह जनकाची** परवानगी घेऊन स्वराज्यांत यावयास निघाले. **जनकानें** चाऱ्ही जामातांस पुष्कळ मौल्यवान् वस्त्रें व दास दासी आंदण दिल्या. **जानकी** प्रभृति चाऱ्ही कन्या श्वशुरगृहीं निघाल्या. तेव्हां त्यांच्या मातांनीं " नम्र गुरुजनांची सेवा करा. पतीनें एखादे वेळीं अपमान केला तरी, विरुद्धवृत्ति होऊं नका. परिजनांशीं चातुर्यानें वागा आणि कितीही अभ्युदय झाला तरी, निरभिमानी रहा." इत्यादि सदुपदेश केला.

**दशरथ अयोध्येंत** येत असतांना त्याची व क्षत्रियांतक **परशुरामाची** वाटेंत भेट झाली. तेव्हां **परशुरामानें**, " शिवधनु कोणी भंगलें? " हाच पहिला प्रश्न केला. **श्रीरामानें** " मीं " असें उत्तर देतांच, परस्परांत पुष्कळ स्पर्धेची व अभिमानाची भाषणें होऊन **श्रीरामानें** त्यास निर्वीर्य व पुण्यरहित केलें. तेव्हां तो **महेंद्राचलीं** गेला.

अयोध्येंतील लोकांस दशरथ राजा सहकुटुंब सहपरिवार येत आहे, असें समजतांच त्यांनीं गुढ्या, तोरणें, ध्वज, पताका वगैरे लावून शहर शृंगारिलें, जिकडे तिकडे मंगल गीतें गाण्यास प्रारंभ झाला, सर्वांचीं मुखकमलें प्रफुल्ल झालीं; आणि जो तो घरो-घर परमोत्सव करूं लागला.

कांहीं दिवसांनीं **भरत** व **शत्रुघ्न** मातुलगृहीं गेले. **श्रीराम** पित्याच्या अनुमतानें राजकार्य काम पाहूं लागला. त्याचें सदाचरण व न्याय करण्याची उत्तम पद्धत पाहून प्रजाजन व मंत्री वगैरे प्रसन्न होऊं लागले. **दशरथाच्या** चार्‍ही सत्पुत्रांत **श्रीरामा**-वर सर्वांची अत्युत्कट प्रीति असे. आणि त्याची कीर्ति-ही देशांतरीं परिप्रसृत होऊं लागली. **श्रीरामाचें** **सीतेवर** प्रेम असे. **सीताही** **श्रीरामाचे** सद्गुण व स्वरूपसंपन्नता पाहून त्यावर स्वप्राणापेक्षां विशेष प्रीति करी. **श्रीरामाचें** पंधरावे वर्षी लग्न झालें. त्यानंतर **सीता रामाची** जोडी बारा वर्षेंपर्यंत सौख्यविलासांत निमग्न होती. **श्रीराम** शांत, मनमि-ळाउ, सर्वप्रिय, धार्मिक, विचारी, दयाळु, न्यायी विजयी परोपकारी, मितभाषी, सत्यप्रिय, गंभीर, व शौर्य-धैर्य-संपन्न होता. तो **मदना**सारखा सुंदर, **बृहस्पति**प्रमाणें बुद्धिमान, **इंद्रा**पेक्षांही पराक्रमी आजानु-बाहु, आणि अश्वविद्येंत व व्यवहारचर्चेंत कुशल होता.

**श्रीराम सर्व सद्गुणपरिपूर्ण आहे. तो राजा होईल तर चांगलें. असें सर्व प्रजेस वाटत होतें. आणि दशरथाच्याही मनांत तशीच उत्कंठा होती, म्हणून**

त्यानें स्वाभिप्राय मंत्रीजनांस कळवून त्यांच्या संमत्तीनेंच **श्रीरामास** यौवराज्याभिषेक करण्याची सिद्धता करून सर्व जनांस सांगितलें " आजपर्यंत मी ह्या राज्याचें पूर्वजांनीं घालून दिलेल्या नियमांप्रमाणें यथान्याय व यथाशक्ति परिपालन केलें. माझ्या प्रजेचें हित करण्यांतच माझें शरीर वृद्धावस्थेस पोंचलें! वृद्धावस्थेंत मन व इंद्रियें बहुधा अवश होतात. प्रभावशक्तिही कमी होते. पुष्कळ दिवस राज्यभार अंगावर घेऊन मी थकलों आहें, असें म्हटलें तरी चालेल. आतां सर्व राज्यभार **श्रीरामाकडे** देऊन माझ्या अशक्त झालेल्या शरीरास कांहीं दिवस विश्रांति द्यावी, असा माझा उद्देश आहे. **श्रीरामानें** सौजन्य, पराक्रम. वगैरे सर्व सद्गुण तुमच्या दृष्टीस इतक्या दिवसांत पुष्कळ वेळ पडले असतील, त्याविषयीं पाल्हाळ करावा असा माझा विचार नाहीं. एतदर्थ **श्रीरामास** यौवराज्याभिषेक करण्यास तुम्ही सर्व सभ्य जन संमत्ति द्याल, अशी मी आशा करितों. **श्रीराम** त्रैलोक्यभार घेण्यास समर्थ आहे. उद्यांक पुष्य नक्षत्रावरच त्यास राज्याभिषेक करावा असा माझा विचार आहे. "

सर्व सभासदांनीं **दशरथाच्या** वचनाचा स्वीकार केला. तेव्हां **दशरथ** पुनः म्हणाला "मला तुमच्या या मागण्याचा संशय दिसतो, म्हणून मी पुनः विचारितों कीं, मी धर्मन्यायानें पृथ्वीचें पालन करीत असून **श्रीरामास** यौवराज्याभिषेक व्हावा, अशी तुम्हांस कां इच्छा झाली?"

" आपणापेक्षां किंवा आपल्या सर्व पूर्वजांपेक्षां **श्रीराम** अतिशय गुणवान आहे. तो दयाळू, विजयी, जितेंद्रिय, धर्मप्रिय व लोकप्रिय आहे. इतक्याकरितांच त्याच्या राज्याभिषेकाची आम्ही इच्छा केली." असेंच बहुतेक सभ्य जनांनी निस्पृहतेनें मागितलें. तेव्हां उद्यांक **श्रीरामास** राज्याभिषेक करावा, असा **दशरथानें** निश्चय व सिद्धताही केली.

हें वर्तमान **कैकयीच्या मंथरा** नामक दुष्ट व नीच दासीस समजतांच तिचा संताप आला. तिनें भलभलते विचार **कैकयीच्या** मनांत भरवून दिले. तेव्हां तिचें मन फिरलें व '**श्रीरामास** राज्याभिषेक होऊं द्यावयाचा नाहीं' असा संकल्प ठरविला. इतक्यांत **दशरथ** तेथें आला; आणि **कैकयीची** क्रोधसंतप्त मुद्रा पहातांच आश्चर्यचकित झाला. त्यानें कामी पुरुषाप्रमाणें तिची पुष्कळ विनवणी केली, तरी ती बराच वेळ एक शब्दही बोलेना. न जाणो आपण फारच हट्ट धरला, तर आपला कार्यभाग साधणार नाहीं असें तिला वाटलें. तेव्हां तिनें **दशरथास** पूर्वदत्त वरप्रदानाची स्मृति देऊन मागितलें " मला वचन दिल्याप्रमाणें उद्यांक **श्रीरामास** चौदा वर्षे वनवासास पाठवा व **भरतास** राज्याभिषेक करा; नाहींतर मी प्राण देईन."

**कैकयीची** दारुण वाणी **दशरथाच्या** हृदयांत वज्राप्रमाणें झोंबली. त्याला शुद्धि नाहींशी झाली आणि आपण आज संकटसमुद्रांत बुडालों, असाही त्याचा दृढ निश्चय झाला. त्यानें **कैकयीचें** पुष्कळ आर्जव केलें. आपल्या दैवास व **कैकयीच्या** कर्मास अतिशय दोष

दिला. त्याच्या बुद्धिसामर्थ्याप्रमाणें त्यानें परम नम्रतेनें व दीनतापूर्वक कैकयीस पुष्कळ सांगितलें; परंतु नीच, स्वार्थी व कपटी मंथरेच्या मायाजालानें ती अगदीं अविचारी झाली. ती दशरथाचें कोणतेंच भाषण मनांत आणीना. आपले सर्व प्रयत्न फुकट चालले, असें पाहून दशरथानें फारच विलाप व परिताप केला; तरी कैकयी आपला दुराग्रह सोडीना. दशरथ जसजसा तिची विनवणी करूं लागला, तसतशी ती फारच चढत जाऊं लागली. शेवटीं दशरथ तिच्या पायां पडला व परम दीनवाणीनें म्हणाला " तें शंबराच्या युद्धांत दोन वेळ माझे प्राण वांचविलेस हें खरें; पण त्या वेळीं दिलेल्या वचनाचा तूं दुरुपयोग करूं नको. क्षमा, सत्य, शांति, धर्म व कृतज्ञतासंपन्न श्रीरामाचा मी कोणत्या अपराधानें त्याग करूं! लोक तुला व मला काय म्हणतील? खरेंच सांगतों, श्रीरामास वनवास दिला तर मी वांचणार नाहीं. श्रीराम माझा पंचप्राण होय. "

दशरथाच्या करुणावचनांचा कैकयीच्या पाषाणहृदयावर मुळींच अधिकार बसेना. मंथरास्वरूप पापमती पिशाच्चानें तिच्या मानसास तें भ्रमित केलें होतें. तें अखेरपर्यंत त्याच स्थितींत होतें. ती कैदाशिणीसारखी मोठमोठ्यानें ओरडूं लागली. गडबडां जमिनीवर लोळूं लागली. दशरथ आदिकरून सर्वांस शिव्या व शाप देऊन म्हणाली " राजा आतां तुला कोणीच धर्मात्मा मानणार नाहीं. तूं वचनभंग होऊन अपकीर्तीस पात्र होऊं नको. अरे, शब्य व

असेंही राजाचा विचार कर. **श्रीराम** धर्मरूप असो किंवा अधर्मी असो. माझें वचन सिद्धीस गेलेंच पाहिजे."

पुन **दशरथ** म्हणाला " **भरत** धर्मात्मा आहे. तो सिंहासनावर बसणार नाहीं. मी मरण पावल्यावर तूं विधवा होऊन पुत्रासह राज्य करण्याची दुष्ट कामना धरूं नको."

सूर्योदय होईपर्यंत **दशरथ कैकयीस** अनेक मऱ्हेनं हितबोध करीत होता; परंतु कांहींच अर्थ-निष्पत्ति आली नाहीं. सूर्योदय होण्यापूर्वीच **श्रीरामास** राज्याभिषेक होणार म्हणून मंगल वाद्यें वाजूं लागलीं. सर्व लोक वस्त्रभूषणांनीं सुसज्ज झाले. गुढ्या तोरणां-च्या व चंदनाच्या सड्यानें राजमार्ग सुशृंगारित व सुगंधित झाले. प्रसन्न मनानें सभ्य गृहस्थ सभा-गृहांत येजा करूं लागले. परंतु, **दशरथ** राजा अवघी रात्र **कैकयीच्या** कठोरतर वाक्‌शरांनीं विद्ध झाल्यामुळें तो त्या राजधर्माच्या मंदिरांत विव्हल होऊन दुःख, शोक, परिताप करीत होता; तरी **कैकयीला** दया येईना. तेव्हां **दशरथानें श्रीरामास** बोला-वण्याकरितां **सुमंत** प्रधानास पाठविलें.

**श्रीराम** सर्व सिद्धता करून निमंत्रणाची मार्ग-प्रतिक्षा करीत होता. सुमंत येतांच तो स्थावरावर निघाला. **लक्ष्मण** त्यावर चामरें ढाळूं लागला. राजमा-र्गांतील हजारों लोक त्याला मंगलप्रद आशीर्वाद देऊ लागले. वीर पुरुष सिंहनादानें विजय जयजयकार करूं लागले. देवादिकांस श्रद्धाभक्तीनें वंदन करीत **श्रीराम** राजसभालयांत आला आणि तेथून **कैक-**

**यी**च्या मंदिरांत गेला. तेथील व्यवस्था पहातांच त्याचा सर्व आनंद तथच्या तेथेच नाहींसा झाला. बराच वेळ हा प्रकार काय आहे हेंच त्याच्या ध्यानांत येईना. **श्रीरामास** पहातांच **दशरथ** पुनः '**श्रीराम**' म्हणून मूर्छित पडला. **सुमंत** त्याला वारा घालून सावध करूं लागला. इतक्यांत **कैकयीनें श्रीरामास** विचारिलें "**रामा**, तूं आश्चर्यचकित होऊं नकोस. राजाच्या विपरीतीचें सर्व कारण मला माहीत आहे. तो लाजेमुळें सांगूं शकत नाहीं. तो जें मागणार तें मीच सांगतें. तें तुला प्रिय किंवा अप्रिय वाटो; पण 'त्याप्रमाणें मी वागेन' असें वचन दे म्हणजे सर्व सांगतें.

"**दशरथ** राजा मला ईश्वरापेक्षांही परम वंद्य आहे. ज्या कृत्यानें त्याचें हित होत असेल, तें कृत्य कितीही दुष्कर असेल तरी मी श्रद्धेनें करीन" असें **श्रीरामानें** वचन देतांच **कैकयीनें** सारा वृत्तांत सांगितला. तिच्या क्रूर वचनांनें **श्रीरामास** वाईट वाटलें नाहीं. किंवा तो भ्यालाही नाहीं; परंतु **दशरथाची** स्थिति पाहून त्याला मरणप्राय दुःख झालें. तो म्हणाला "माते, मी तुझ्या आज्ञेप्रमाणें आतांच **भरतास** राज्य देऊन वनवासास जाईन. मग पित्याची आज्ञा असेल तर ती शिरसावंद्य करण्यास क्षणाचाही अवकाश नको."

"तूं गेलास की राजा आतां सावध होईल" असें **कैकयीचें वचन ऐकतांच लक्ष्मणासह श्रीराम कौसल्येच्या** मंदिरांत आला. तेव्हां अभिषेकहेतु सिध्यर्थ ती पर-

मशःचिंतन करीत होती. तिनें श्रीराम-लक्ष्मणास पहातांच क्षेमकुशल विचारिलें. श्रीरामानें कैकयीच्या महालांत घडलेलें सर्व वृत्त तिला निवेदन केलें. तेव्हां तिच्या शोकसागरास अनिवार भरतें आलें. तिनें कल्पांत केला; परंतु श्रीराम-लक्ष्मणानें तिचें सांत्वन केलें. ती दैवगतिप्राबल्यावर विश्वास ठेवून शांत राहिली. नंतर श्रीराम सीतेच्या वाड्यांत आला. त्यानें तिला पुष्कळ प्रकारांनीं अयोध्येंतच राहण्याचा आग्रह केला. तेव्हां ती म्हणाली " प्राणप्रिया, माझ्या माता पितरांनीं मला जी आज्ञा केली आहे, त्याप्रमाणें वागणें माझें कर्तव्य होय. तुम्ही सुखांत असा, किंवा दुःखांत असा; मी तुमची अर्धांगी आहें. मी तुमच्याबरोबर येणार. मला त्रैलोक्याचें ऐश्वर्य मिळालें, तरी मी पतीची एकनिष्ठेनें सेवा करण्याचें आमरण सोडणार नाहीं. मजकडून तुम्हांस तिळभरदेखील दुःख होणार नाहीं. चौदा वर्षे कां मी हजारों वर्षे तुम्हांबरोबर वनवासांत काळ घालविण्यास समर्थ आहें. तुम्ही येथें नसतांना या नरकतुल्य नगरांत मी क्षणभरदेखील रहाणार नाहीं "

श्रीरामानें धीर गंभीरतेनें व लडिवाळपणानें सांगितलें " प्रिय सीते, वनांत फार दुःख आहे. तेथें जीं कंद-फल-मुळें सांपडतील, तीं खाऊन निर्वाह केला पाहिजे. तुझ्या कोमल प्रकृतीला तें दुःख असह्य. भयानक श्वापदांचे परम भयंकर शब्द ऐकून तुला भीति वाटेल. वल्कलें धारण करून रहावयाचें फार कठीण. स्वहातानें झाडांची पानें तोडून त्यांवर झोंपलें पाहिजे.

घंडीवारा किंवा पर्जन्य यांची पीडा तुझ्या सुकुमार देहास सहन होणार नाहीं. माझ्या मतें तूं बरोबर न येशील तर चांगलें."

सीता ह्मणाली "तुमच्या सहवासांत राहून मास काहीं होवो. मी अजितेंद्रिय असतें, तर मला वनवासाची इतकी भीति वाटती. काहीं नाहीं, माझ्या प्राक्तनांत जें असेल तें घडेल."

श्रीरामानें सीतेच्या अत्याग्रहाकरितां तिला व लक्ष्मणासही बरोबर नेण्याचें मान्य केलें. तिघांनींही पुष्कळ दान धर्म केला; आणि श्रेष्ठजनांस वंदन करून तीं वाड्याबाहेर आलीं. दैवगति विचित्र आहे! आणि राजे लोकांच्या सेवेंत अधमाधम दास-दासी असल्या, तर त्यांच्या दुष्ट कर्मांचा परिणाम राजांस कसा भोंवतो, हेंही त्यांनीं विचार करण्यासारखें आहे. अयोध्येंत दशरथाचें निंद्य कृत्य व श्रीरामाची सौजन्यता, उदारता, पितृभक्ति, दया, स्वार्थत्याग व वनवासगमनाची वार्ता जलांतील तैलबिंदुप्रमाणें परिप्रसृत झाली. त्याबरोबर सर्वत्रांच्या तोंडचें पाणी पळालें. जो पहावा तो शोकमग्न झालेला. कित्येक कोंवळ्या मनाचे लोक ढळढळां रडूं लागले. कित्येक श्रीरामाच्या गंभीरतेचें वर्णन करूं लागले. कित्येकांनीं कैकयीच्या दुराचरणाची निर्भत्सना केली. कित्येक दशरथाच्या स्त्रीवशतेची चर्चा करूं लागले. कित्येकांनीं लक्ष्मणाच्या बंधुप्रीतीची स्तुति चालविली आणि बहुतकांनीं सीतेच्या पतिनिष्ठेची व पातिव्रत्याची धन्यता मानिली.

अशा प्रकारच्या चर्चेंत कांहीं वेळ गेल्यानंतर प्रजाजनांनीं **श्रीरामाबरोबर** वनांत जाण्याचा निश्चय केला. ते परस्परांस सांगूं लागले "आह्मी संपत्ति घेऊन वनांत गेलों कीं, **अयोध्या** अरण्यवत् होईल, तिला घेऊन **कैकयी** पाहिजे तें करो."

लोकांच्या प्रेमभरित वचनानें **श्रीरामाच्या** अंतःकरणास मळीच विकार आला नाहीं. तो पित्राज्ञा घेण्याकरितां **दशरथाकडे** गेला. तेव्हां तेथें सर्व राण्या, सुमंत व इतर सज्जनांची दाटी गर्दी होती. **श्रीराम, सीता व लक्ष्मण** ह्यांस पहातांच सर्वांनीं आकांत केला. त्यांच्या हृदयद्रावक व शोकजनक स्वरानें दाही दिशा ओदासीन्यानें भरल्या, तरी **कैकयीच्या** वज्रकठोर व निष्ठुर मनास अगदीं द्रव आला नाहीं. त्रिवर्गांनीं लीनतेनें व करुणाजनकस्वरानें श्रेष्ठजनांस वंदन केलें, सर्वांचा निरोप घेतला. नंतर **श्रीराम दशरथास** सांगूं लागला "महाराज, मी सत्य व पुण्य ह्यांची शपथ वाहून सांगतो कीं, तुमची आज्ञा शिरसावंद्य करणें हा माझा धर्म व कर्तव्य होय. यापुढें मला राज्य तर काय! पण स्वर्गादिही तुच्छ आहे. आह्मांविषयीं चिंता किंवा दुःख करूं नका. आह्मांला तुह्मी सदय मनानें आज्ञा द्या."

**"हाय! हाय! किती मी हतभाग्य! श्रीरामा, माझ्या दुर्दैवास सीमा नाहीं. काळस्वरूपी कैकयीस वचन देऊन मी माझा सर्वस्वी घात करून घेतला**

अरे. तुम्ही मला बंदीवासांत ठेवा आणि सुखानें राज्य-करा " असें दशरथानें सांगितलें.

" तात, तुम्ही अत्यानंदानें आणखी हजारों वर्षे राज्य करा. तुमच्या आज्ञेचा भंग करून राज्य-सुख भोगावें, अशी मला शपथपुरःसर इच्छा नाहीं. वन-वास पूर्ण होतांच मी आपल्या सेवेंत सादर-तत्पर राहीन. " असें श्रीरामानें सांगितलें, आणि तो दशरथास वंदन करून निघाला. तेव्हां जो अंतर-विदारक आक्रोश झाला, त्यानें कल्पांताचा भास होऊं लागला.

सुमंत ह्मणाला " कैकयी, विचार कर. शुद्धी-वर ये. अशा दुष्कर्माचा परिणाम चांगला होणार नाहीं. पतीच्या इच्छेप्रमाणें चालणें हाच कुलीन स्त्रियांचा धर्म होय. दुर्मतीनें पतिविनाशास प्रवृत्त होणें तुला अयोग्य. शताधिक पुत्रसौख्यापेक्षां पति-वचनीं तत्पर राहण्यांत अपार सुख आहे. इक्ष्वाकु कुलाच्या रीतीचा तूं नाश करूं पहात आहेस; परंतु आह्मी सर्व नगरवासी जन श्रीरामाबरोबर गेलों, तर तूं काय करशील? शिव! शिव! श्रीराम वनांत गेला तर सर्व लोक तुझी निंदा करतील आणि महाराजांची काय अवस्था होईल, हेंही सांगण्यास मी असमर्थ आहें."

सुमंताच्या हितकर व मधुर भाषणाचा कांहींच उप-योग झाला नाहीं. सिद्धार्थादि कित्येक मंत्रीजनांनीं कैकयीची पुष्कळ प्रकारें समजावणी केली; परंतु फुकट! तेव्हां दशरथानें सांगितलें " कैकयी, तुझ्या

**अधमाधमतेची** सीमा झाली. दुष्टे, निर्लज्जे, घातके, तूं इतकी असन्मार्गवर्ती होशील, असें धिःकारकर्म करशील, अशी नीचता स्वीकारशील, इतका दुराग्रह धरशील किंवा भलतेंच कांहीं मागशील असें कोणाच्याही स्वप्नीं आलें नसेल. असो. घे आपल्या **भग्नाम** आणि लोकशून्य नगरीचें राज्य कर. आम्ही सर्व धनधान्य व द्रव्य घेऊन **श्रीरामाबरोबरच वनांत** जातों."

**कैकयीचें** सर्वांग भयानें थरथरलें. तिचा कंठ बसला. एक शब्दही बोलण्यास तिला सामर्थ्य नव्हतें. तरी तिनें सांगितलें "भग्नाम व द्रव्य-संपत्ति-शून्य असें राज्य काय करावयाचें."

परस्परांच्या वादविवादांत बराच वेळ गेला. तरी त्यांत कांहीच अर्थ नव्हता. शेवटी कैकयीनें **श्रीरामास व सीतेस** फाटकीं तुटकीं वस्त्रं आणून दिलीं. तेव्हां सचिवांनीं आक्रोशानें अगदीं हैराण केलें. **कौसल्या** तर मूर्च्छित पडली. तेव्हां जर भूमि दुभंगली तर तींत ती सुखानें प्रवेश करील. **दशरथासही** आकाश कोसळलें असें दिसूं लागलें. सर्वांच्या नेत्रांतून अविरल दुःखाश्रुधारा चालल्या. आतां मरण येईल तर चांगलें असें सर्वांसच वाटलें; परंतु **कैकयीचा** मनोनिग्रह लवलेशही ढळला नाहीं. **सीता-राम** तीं जीर्ण वस्त्रं अंगावर घेऊं लागला. तो संतापजनक प्रकार पहातांच शांत व गंभीर मनाच्या **वसिष्ठ** ऋषींस स्वस्थ रहावेना. त्यानें संतापानें सांगितलें "कुलविध्वंसक **कैकयी**, तुझें निंद्याचरण पाहून सर्वांस महत् क्लेश होत आहे.

तूं इतकी दुर्मति कशी झालीस देव जाणे! मी इतका वेळ तुझें प्रत्येक कृत्य पहात आहें, त्यावरून तूं मनुष्य ह्या नांवास कलंक लाविलास, असें म्हटलें तर दोघांनाही भय नाहीं. तूं सीतेस अशीं जीर्ण वस्त्रें कां दिलींस? श्रीरामास वनांत पाठवीन असें दशरथानें वचन दिलें आहे. श्रीराम वनवासास गेला तरी तो येईपर्यंत सीतेस राज्याचा सर्वांशीं न्याय्य व भाग आहे. तूं असा असमंजसपणा करूं नको. सदसद्विचार कर. श्रीराम वनांत गेला की त्याचे सर्व बंधुबांधव त्याच्याबरोबर जातील. आपला भरत येथें राहील असें तुला वाटत असेल. पण तीही तुझी चूक आहे. तुझ्या अशा दुराग्रहानें त्याचें सर्वथा अनहित होईल."

कैकयी काळ कोपांत आली होती. तिची सदसद्विचारशक्ति समूळ गेली होती. कांहीं झालें तरी आपला हेतु सिद्धीस न्यावयाचा. मग त्यांत कांहीं होवो. त्याविषयीं ती निष्काळजी होती. श्रीरामास दशरथानें आशीर्वाद दिला. सर्व लोक हाहाःकार करूं लागले. दशरथ पुनः मूर्छित पडला. वसिष्ठ ऋषीही दुःखाश्रुपूर्ण नयनानें श्रीराम-सीतेकडे पाहूं लागले. तेव्हां कौसल्या फुंदत सीतेस सांगूं लागली " सीते, पतीकडून नेहमीं सत्कार होत असून ज्या स्त्रिया त्याच्या कष्टदशेंत त्याची सेवा करीत नाहींत, त्यास किंवा जी स्त्री अनृत भाषण करिते, नेत्रादि-कांनीं संकेत करिते, पर पुरुषाशीं स्नेह ठेविते, पतिसेवेंत अलक्ष्य किंवा अनास्था करिते, आपल्या आप्त-इष्ट-जनांशीं विरुद्ध रीतीनें वागते तिला अ-सती

म्हणतात. अशांचें मन पापासक्तींतून निघणें परम दुर्घट. कांहीं केलें तरी, त्यांचें मन निंद्य कर्मांतून पराङ्मुख होत नाहीं. त्या प्रत्यहीं असन्मार्गांत प्रवृत्त असतात. पतिव्रता स्त्रिया नेहमीं सदाचरणांत, गुरुजनांच्या हितकर उपदेशांत, कुलमर्यादा रक्षण करण्यांत आणि पतिसेवेंत तत्पर असतात. धर्माच्या इतर साधनांत स्त्रियांस पतिसेवा हेंच एक सर्वोत्तम साधन आहे. त्यासारखें सर्वार्थप्रद साधन कोणतेंच नाहीं. तुला पतिव्रतांचे आचार-विचार चांगले समजतात व तूं सदाचरणी पतिव्रताशिरोमणी आहेस. तरी माझ्या **श्रीरामाचा** प्रवासांतदेखील अपमान करूं नकोस. **श्रीराम** धनवान असो, किंवा निर्धन असो. तो तुला इष्ट देवच आहे" त्यानंतर ती **लक्ष्मणास** सांगूं लागली "तुला मीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. तूं सूज्ञ आहेस. तुझी **श्रीरामावर** अत्यंत प्रीति आहे. वडील बंधूशीं सख्यत्वानें वागणें हा तुमचा कुलपरंपरा-सिद्ध धर्मच आहे. **श्रीरामास** सांभाळ म्हणजे झालें."

**श्रीराम** रथांत बसूं लागला, तेव्हां त्याला फार **गहिंवर** आला. त्याच्या कमलनेत्रांतून टाप् टाप् दुःखाश्रु पडून गाल भिजले. शोकाचा वेग असह्य झाला. तरी तो रडत रडत पित्याकडे पाहून म्हणाला "माझी **माता कौसल्या** जरी वृद्ध झाली आहे, तरी तिचा **मजबरोबर** येण्याचा विचार होता. पण, केवळ ती **आपली सेवा करण्याकरितांच येथें रहात आहे. तिला अशा अपरिहार्य दुःखभाराचा कधींच अनुभव नाहीं.**

म्हणून ह्या परितापानें तिच्या मनास अतिशय क्लेश होणें स्वाभाविक आहे. तुम्ही तिचा सांभाळ आस्थेनें करा म्हणजे झालें. आजपर्यंत मी कोणालाही माझ्या स्वभावाप्रमाणें किंवा चुकीनें कठोर वचन बोललों असेन किंवा कोणतेंही अयोग्य कृत्य मजकडून घडलेलें असेल, तर त्याची मला सर्वांनीं क्षमा करावी अशी लीनतेनें माझी विनंति आहे."

श्रीराम सर्वांचा निरोप घेऊन निघाला. तेव्हां सर्व मंडळी मोठमोठ्यानीं रडूं लागली. दशरथाचे तर पंचप्राण जातात असा त्याला भास होऊन तो मूर्छा येऊन 'श्रीराम' म्हणत धाडकन् भूमीवर पडला. आधींच तो दुःखी; त्यांत त्याला तो कोलाहल ऐकून मरणप्राय दुःख झालें. कौसल्येनें त्याला सावध केलें. तेव्हां तो पुनः विलाप करूं लागला; आणि म्हणाला "श्रीराम! देवा, काय हें संकट! हाय हाय रे दैवा! माझा श्रीराम वनवासपीडा कसा सहन करील! अरेरे सीतेस किती यातना भोगावी लागेल! कैकयी तूं आपले सर्व मनोरथ पूर्ण केलेस. आतां विधवा हो आणि राज्य कर."

श्रीराम वनांत जाऊं निघाला, तेव्हां जिकडे तिकडे दुश्चिन्हें होऊं लागली. दश दिशा अंधःकार-व्याप्त झाल्या. वारंवार भूकंप झाले. सर्वांनीं कैकयीचा निरस्कार व दशरथाचा धिःकार केला.

दशरथ कैकयीच्या महालांतून कौसल्येच्या महालीं आला, तरी दारुण खेदामुळें कोठेंच त्याचें मन शांत होईना. तो 'श्रीराम' असा जप करी, दुःखानें दीर्घश्वास

सोडी, आणि आतां राम काय करीत असेल? कोठें असेल? अशा विचारतरंगांत रडत व पश्चात्ताप करीत पडे. कौसल्येच्या दुःखास व शोकास पारावार नव्हता. तिचें यथाशक्ति सुमित्रा सांत्वन करण्याचा प्रयत्न करी; परंतु तिचें समाधान होईना.

श्रीरामाबरोबर पुष्कळ नागरीक जन निघाले होते व त्यांपैकीं कित्येकांचा श्री रामाबरोबर वनवासांतही राहण्याचा विचार होता; परंतु श्रीरामानें त्यांस सांगितलें " अयोध्यावासी जन हो, तुम्ही मजवर जसें प्रेम ठेवितां, तसेंच भरतावरही ठेवा. त्याला तसाच सन्मान द्या. तो ज्ञानी व सद्गुणी आहे. तो तुमचें चांगलें रक्षण करील. सारांश, राजाला संताप किंवा परिताप न होईल असें तुम्ही वागा. अ तां तुम्ही माघारे जाल तर मजवर फार उपकार होतील. "

असें सांगत श्रीराम, सीता व लक्ष्मण ह्यांसह तमसानदीतीरीं आ ।. सुमंतानें रथ स्थिर केला. त्रिवर्ग रथांतून उतरलीं. लक्ष्मण ह्मणाला " आतां अयोध्येचें स्मरणदेखील नको. ती निःसंदेह शोकमग्न झाली असेल! मातापितरें रडून रडून अंध न होवोत ह्मणजे झालें. भरत धर्मात्मा आहे. तो सर्वांस आश्वासन देईल. आपल्याबरोबर येण्याचा कित्येक नगरजनांनी निश्चय केला आहे. ते झोंपले ह्मणजे आपण येथून निमूटपणें निघावें. " लक्ष्मणाचे विचार श्रीरामादिकांस चांगले वाटले. श्रीरामानें सुमंतास सांगून रथ सिद्ध करविला; आणि सीता व लक्ष्मण यांसह तो रथांत बसला व गोमती नदीचे कांठीं

आला. तेथून निघाल्यावर तो **शृंगवेर** येथें **गुहक** नांवाच्या भिल्लाधिपतीस भेटून **गंगा** नदीपलीकडे निघाला. तेव्हां त्यानें **सुमंतास** निरोप दिला; आणि **गुहकानें** आणून दिलेल्या वडाच्या चिकानें **श्रीराम** व **लक्ष्मण** ह्यांनीं जटाबंधन केलें. नागरिक जन दुसरे दिवशींच दुःख करीत **अयोध्येंत** निघून गेले.

**प्रयागास** आल्यावर ते **गंगा यमुनादि** परम पावन नद्यांच्या स्नानदर्शनानें कांहींसे शांत झाले. **अंतर्वेदी** प्रांतांत आल्यावर ते **भारद्वाज** ऋषी-च्या आश्रमीं कांहीं दिवस राहून **चित्रकूटीं** गेले.

**अयोध्येंतील** सर्व लोकांच्या दुःखास पारावार नव्हता. राजवाड्यांतील सर्व मनुष्यें दुःख-शोकार्त होतीं. **दशरथ** कौसल्येच्या महालीं असे. तो एक-सारखा **श्रीराम सीतेचे** गुणानुवाद आठवी, **रडे,** पश्चात्ताप करी व आपल्या दैवास--कर्मास--बोल लावी. जेव्हां त्यानें **कौसल्येस** आपल्या पूर्व कर्मांच्या कित्येक गोष्टी सांगितल्या, तेव्हां त्यानें **श्रावणवधाचीही** गोष्ट सांगितली. तेव्हांतर त्याचा शोक अनिवारच झाला. तो अधीर होऊन आक्रोश करूं लागला. त्याचीं इंद्रियें विगलित होऊं लागलीं. कंठ शुष्क पडला. त्याला वारंवार मूर्छा येऊं लागल्या आणि तो प्राणांताच्या स्थितींत '**श्रीराम**' म्हणत परलोक-वासी झाला.

**वसिष्ठानें** मंत्र्यादिकांस सांगून राजगृहाहून **भर-तास** सत्वर आणविलें. त्याला **श्रीरामाच्या** वनवास-गमनाचें व **दशरथाच्या** परलोकवासाचें वर्तमान

समयतांच, विद्युतप्रहार आल्यासारखें दिसलें. त्यानें-ही असीम शोक केला. मातेची फारच निर्भत्सना केली. शत्रुघ्न तर मंथरेस तेव्हांच ठार मारण्या-करितां धांवला; परंतु 'स्त्रीहत्या करणें तुला योग्य नव्हे,' असें सांगून भरतानें त्याचा क्रोध शांत केला. दशरथ परलोकगत झाल्यावर चौदावे दिवशीं कारभाऱ्यांनीं भरतास राज्याभिषेक करण्याची इच्छा प्रदर्शीत केली. तेव्हां वसिष्ठ ऋषीनें सर्व सभास-दांस सांगितलें "धर्मात्मा दशरथ राजा परलोकवासी झाला. त्यानें हें राज्य भरतास दिलें आहे; आणि पितृवचनाचा श्रीरामानेंही स्वीकार केला आहे. आतां भरतानें सिंहासनाधिष्ठित व्हावें, अशी सर्वांची इच्छा आहे. कारण, प्रजेस राजा असणें अत्यावश्यक होय."

भरतानें सांगितलें "दशरथाचा जेष्ठ पुत्र सिंहासनाचा अधिकारी आहे. त्याच्या राज्याचा अपहार करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. मी आतां जातों; आणि श्रीरामास घेऊन येतों."

भरतानें श्रीरामाकडे जाण्याची सिद्धता केली, तेव्हां सुमंत, वसिष्ठ, शत्रुघ्न, कौसल्या, सुमित्रा, व कैकयी हीं त्याबरोबर निघालीं. अनेक नागरीक जनांसह भरत शृंगबेर येथें आल्यानंतर त्यानें दशरथाचें तीर्थश्राद्ध पवित्र सलिला गंगा नदीकांठीं केलें. तेथें गुहक त्यांस भेटला. त्यानें सर्वांचें चांगलें आदरातिथ्य केलें. श्रीरामाचें तेथील वृत्त निवेदन केलें आणि दुसरे दिवशीं त्यांस नदीपार केलें.

सर्व मंडळी भारद्वाज ऋषीच्या आश्रमांत राहिली.

तेथें त्यांस श्रीराम चित्रकूटीं आहे, असें समजलें. दुसरे दिवशीं ते चित्रकूटीं पोंचले. भरत, श्रीरामास भेटला व अयोध्येस येण्याविषयीं त्यास आग्रह करूं लागला; परंतु रामानें त्याचें थोडक्यांत शांतवन केलें. श्रीरामास दशरथाचें अशुभ वृत्त समजलें, तेव्हां तो मूर्छित पडला. सीता व तिन्ही बंधूंनी त्यास सावध केलें. इतक्यांत तेथें जनक राजाही येऊन पोंचला.

सर्वांचें क्षेमकुशल व आदरातिथ्य झाल्यावर भरतानें श्रीरामास अयोध्येस येण्याविषयीं अतिशय आग्रह केला. परंतु, श्रीरामानें "पित्याची आज्ञा उल्लंघन करणें किंवा दिलेल्या वचनास फिरणें हा आपला धर्म नव्हे." असें सांगून त्याची समाधानी करण्याचा प्रयत्न केला; श्रीरामाचें वाक्चातुर्य, धर्मश्रद्धा, कर्तव्य-पालन, दक्षता व अलौकिक स्थैर्यता पाहून जनक राजा त्यास धन्यवाद देऊं लागला. परंतु, आपला इष्टार्थ सिद्धीस जात नाहीं, असें पाहून भरतास फार खेद झाला. सुमंतप्रभृति तेथें जमलेल्या लोकांनीही श्रीरामास अनेक तऱ्हांनीं सांगितलें; परंतु श्रीरामानें थोडक्यांतच त्यास निरुत्तर केलें. शेवटीं वसिष्ठाच्या आज्ञेप्रमाणें भरतानें सुवर्णपादुका श्रीरामापुढें ठेविल्या. त्यांस श्रीरामानें स्वचरणकमलें लावून त्या भरताकडे दिल्या. तेव्हां त्यांस वंदन करून भरतानें सांगितलें "राज्याचा सर्व अधिकार ह्या पादुकांच्या स्वाधीन करून मीही श्रीरामाप्रमाणें जटावल्कल-धारी होऊन चौदा वर्षें अयोध्येबाहेर राहीन; आणि चौदाव्या वर्षाच्या शेवटील दिवशीं जर श्रीरामाचें

दर्शन झालें नाहीं, तर अग्निप्रवेश करीन."

श्रीरामानें भरताच्या प्रतिज्ञेचा स्वीकार करून तो भरत शत्रुघ्नास आलिंगन देऊन ह्मणाला "तुम्ही कशाचा मनास राग धराल, तर तुम्हांला माझी शपथ आहे."

भरतानें सीतारामास वंदन करून सर्व सेनेसह तेथून तळ उठविला. श्रीरामही वसिष्ठ, जनक राजा, माता व ब्राह्मण यांस वंदन करून पर्णकुटीस आला. भरताचें प्रेम, श्रीरामाची स्थिरता, सत्यवचन व पितृभक्ति आणि सीतेचें पातिव्रत्य पाहून जनक राजा संतुष्ट झाला आणि सर्वांस भेटून मिथिला नगरीस या समयास तेथून निघाला.

भरतानें अयोध्येंत येतांच शुभदिवशीं श्रीरामाच्या पादुकांस राज्याभिषेक केला व राज्याची व्यवस्था लावून नंदीग्रामांत येऊन राहिला. भरतादि सर्व मंडळी चित्रकूटाहून गेल्यानंतर श्रीरामही अत्री ऋषीच्या आश्रमीं आला. अत्रीनें त्याचा चांगला सत्कार केला; आणि सीतेस स्वपत्नि-अनुसूयेची भेट घेण्याची सूचना दिली. सीता अनुसूयेकडे गेली. तेव्हां तिची भिकार स्थिति पाहून अत्रीपत्नि ह्मणाली "सीते, तूं राजकन्येचा अभिमान, राज्यसुखोपभोग, व आप्त-संबंधीय जनांचा मायामोह त्यागून केवळ धर्मबुद्धीनें श्रीरामाबरोबर वनवासांतही आलीस हें फार चांगलें केलेंस. ज्या स्त्रिया पति कोणत्याही स्थितींत असला तरी त्याची एकनिष्ठेनें सेवा करितात व त्यालाच इष्ट देव मानितात,

त्याच पतिव्रता. एतांपेक्षां ह्यांस कांहींच विशेष नाहीं. ज्या स्त्रिया कामवश किंवा वैभवसुखाधीन होतात, त्या साहजिक धर्मविमुख होतात. ह्यामुळें त्यांची इहलोकीं अपकीर्ति होते व परलोकीं त्यांस नरकवासाचें परम दुःखदायक क्लेश भोगावे लागतात."

सीता ह्मणाली "माझ्या मातेनें व सासूनें मला असाच बोध केला आहे व तो मी हृदयांत दृढ धरिला आहे."

अनुसूया सीतेच्या भाषणानें प्रसन्न झाली. तिनें सीतेला पुष्पमाला, वस्त्रें व आभरणें दिलीं आणि तिच्या अंगास सुगंध चंदनाची उटी लावून सांगितलें "मी दिलेल्या वस्तूंपैकीं एकही बिघडणार किंवा अपवित्र होणार नाहीं."

नंतर अत्रीचा आशीर्वाद घेउन श्रीराम दंडकारण्यांत आला. तेथें विराध राक्षसानें सीताहरण करण्याचा घाट घातला होता; परंतु श्रीराम लक्ष्मणानें त्यास ठार मारून शरभंग मुनीचा आश्रम गाठला. कोठें एक रात्र, कोठें आठ दिवस, कोठें पंधरा दिवस-महिना-वर्ष राहात राहात श्रीरामानें वनश्री वगैरे पाहण्यांत दहा वर्षे घालविलीं. सुतीक्ष्ण मुनीच्या आश्रमांतून निघून श्रीराम अगस्त्याश्रमीं आला. त्या ऋषीनें त्रिवर्गाचेंही चांगलें आदरातिथ्य केलें; आणि श्रीरामास एक उत्तम धनुष्य, ब्रह्मदत्त नामक एक बाण, अक्षय्य भाते आणि त्यास इंद्राकडून मिळालेली सुवर्णाच्या म्यानाची एक तलवार इतकीं अर्पण केलीं. अगस्तीस प्रणाम करून निघाल्यावर श्रीरामास मा-

गांत गृध्र पक्षी भेटला. तो गृध्र **गरुडाच्या अरु-ण** नामक बंधूचा पुत्र असून **दशरथ** राजाचा **मित्र**. त्याच्या वडील बंधूचें नांव **संपाति** व गृध्रपतीचें नांव **जटायु**. हा आपल्या पित्याचा मित्र व हितकर्ता आहे असें समजून **श्रीरामानें लक्ष्मणास** तेथेंच एक पर्णशाला तयार करावयास सांगून कांहीं दिवस राहण्याचा विचार ठरविला. तेव्हां **जटायु** ह्मणाला " तुह्मी येथें राहण्याचें कराल तर त्यांत मला संतोष आहे. तुह्मी वनांत कंदमुळें आणावयास जरी गेलां, तरी मी मोठ्या आस्थेनें व दक्षतेनें **सीतेचें** संरक्षण करीन. "

एके दिवशीं **श्रीराम, लक्ष्मणाशीं** सुख-दुःखाच्या व नीति-न्यायाच्या गोष्टी बोलत पर्णकुटिकेच्या **बाहेर** बसला होता. इतक्यांत यदृच्छेनें प्रबल राक्ष-साधिपति **रावणाची** बहीण **शूर्पनखा** तेथें आली आणि **श्रीरामाचें** अपूर्व सौंदर्य पाहून मोहित झाली. **तिनें श्रीरामाच्या** स्थितीशीं व स्वरूपाशीं आपली **तुलना करून पाहिली, तों जमीन-आस्मानचें अंतर. श्रीराम** कमलनेत्र, आपण भयंकर; **श्रीराम** फारच सुंदर, आपण अक्राळ विक्राळ; **श्रीराम** प्रियरूप, **आपण कुरूप; तो तरुण, आपण वृद्ध; श्रीराम चतुर, आपण मूर्ख; श्रीराम सदाचरणी, आपण दुराचरणी; असा विचार त्या कामविव्हल राक्षसीचे मनांत येतांच तिनें आपलें रूप पालटलें व ती देवांगनेसारखी होऊन श्रीरामास ' आपला पति हो ' अशी विनंति करूं लागली. तेव्हां श्रीरामानें**

विनोदार्थ ती सीता **लक्ष्मणाकडे** पाठविली. **लक्ष्मणानें** तिला नानातऱ्हेनें समजावून सांगितलें; परंतु ती कांहीं केल्या ऐकेनाच. तेव्हां **लक्ष्मणानें** तरवार घेऊन तिचें नाक व कान कापून टाकिले. त्यावरोबर ती कल्पांत करीत दंडकारण्यांतील **खर** राक्षसाकडे गेली.

**खरानें** तिची सर्व हकीगत ऐकून, चौदा राक्षस बरोबर देऊन **शूर्पनखेस** रवाना केलें. राक्षसांचें व **श्रीरामाचें** युद्ध होऊन **श्रीरामानें** एका बाणानें त्यांचा संहार केला. तेव्हां पुनः **शूर्पनखा खराकडे** जाऊन ऊर बडवून रडूं लागली. त्यानें स्वतः चौदा हजार राक्षस बरोबर घेतले व **श्रीरामाशीं** युद्ध आरंभिलें. प्रथमतः त्याचा सेनापति **दूषण** हा पुढें आला. त्यावर गंधर्वास्त्राचा प्रयोग करून **श्रीरामानें** त्यासह पांच हजार राक्षसांस ठार मारिले. तितक्यांत **त्रिशिर** खरबंधु राक्षस **खरास** मागें करून **श्रीरामाशीं** युद्धास प्रवृत्त झाला. त्याचीं तिन्ही शिरें **श्रीरामबाणानें** भूमिगास एकदम अर्पण केलीं. नंतर **खर** धनुर्विद्येचा चमत्कार दाखवूं लागला. त्यानें आपल्या होता तितका पराक्रम दाखविला व **श्रीरामावर** वृक्ष-पाषाणादि टाकून फार त्रास दिला. तेव्हां **श्रीरामानें ब्रह्मदत्तास्त्रा**-चा प्रयोग करून **खराच्या** देहाचा भस्म ढीग पाडिला.

**खर, दूषण** व **त्रिशिर** यांच्या विध्वंसाचें शोकदायक वर्तमान **अकंपन** नामक एकाच्या राक्षसानें **लंकेंत** जाऊन **रावणास** सांगितलें. त्याबरोबर राक्षस-**राज दशानन-रावणाच्या** अंगाची आग झाली. **कारण,**

तो फार गर्वोन्मत्त झाला होता. तो ह्मणाला " अरे, इंद्र, यम, वरुण किंवा विष्णुही माझें अप्रिय करूं शकणार नाहीं; असें असून कोणाला आपल्या प्राणाचा कंटाळा आला? माझें अप्रिय करील त्याला देवही आश्रय देऊं शकणार नाहीं. मी मृत्यूला मारीन. अग्नीला जाळून टाकीन, वायूची गति कुंठित करीन आणि सूर्यासुद्धां आकाशांतून हिसडून पाडीन. "

अकंपनानें श्रीरामचरित्र रावणास सांगतांना तो तेजस्वी, दिव्यास्त्र, संपत्तियुक्त, अद्भुत रणकुशल, धीर वीर आहे, असेंही सुचविलें. लक्ष्मणाच्याही प्रबल पराक्रमाची स्तुति केली; आणि सांगितलें " त्यांच्याबरोबर त्रैलोक्यांतील सर्व सौंदर्य एकीकडे करून बसलेली एक स्त्री आहे. तिचें हरण केलें, तर श्रीराम व लक्ष्मण तिच्या वियोगजन्य दुःखानें तेव्हांच मरतील. " अशीही आपल्या बुद्धिसामर्थ्याप्रमाणें सूचना केली.

रावण अकंपनास निरोप देऊन आकाशमार्गानें त्राटिका-पुत्र मारीच ह्याकडे गेला. रावणाच्या भीतीनें मारीचही तपश्चर्या करीत असे. त्यानें रावणाचा उत्तमोत्तम भोजनादिकांनें आदर केला व कुशल वृत्त विचारिलें; तेव्हां रावण सांगूं लागला, " श्रीरामानें दंडकारण्यांतील माझ्या राक्षससेनेचा संहार केला; ह्मणून त्याच्या स्त्रीचें हरण करून आणण्याचा निश्चय आहे; तूं ह्या कामीं सहाय हो, ह्मणजे झालें . "

मारीचानें रावणास श्रीरामाचें महत्व व समरनैपुण्याविषयीं बरेंच वर्णन सांगितलें. तेव्हां रावण शांत होऊन लंकेंत आला. त्यानें सीता-हरणाचा नाद

सोडिलाच होता; परंतु तितक्यांत त्याची शूर्पणखा बहीण तेथें आली. तिची श्रीराम-लक्ष्मणांनीं चांगली खोड जिरविली होती; आणि तिची कामवासनाही तृप्त झाली नव्हती. त्यामुळें ती अपमानानें व निराशेनें उन्मत्त झाली होती. ती रावणाच्या मनास सांगूं लागली "तूं समुद्रासही शुष्क करणारा, पर्वतास पाहिजे तिकडे फेकून मनास मिळविणारा, देवांचें मर्दन करणारा, यज्ञांचा उच्छेद करणारा, परस्त्रियांवर बलात्कार करणारा, दिव्यशस्त्रास्त्रप्रयोगप्रवीण, मनुष्याशिवाय कोणाच्याही हातानें न मरणारा, अजिंक्य, त्रासदायक असे असून माझी अशी विरूपता पाहून तुला कांहींच राग येत नाहीं? तूं असा स्वच्छंदाचारी, काम भोगासक्त, राजनीतिज्ञानशून्य कसा झालास? स्वैराचारी राजास प्रजा मान देत नाहीं. राज्याचें ज्याला भय नाहीं, त्याचें राज्य लौकरच लयास जातें. तूं सर्वांशीं विरोध केलास, पण राम हेरांकडून वर्तमान आणवीत नाहीस. बालकासारखें वागणें तुला अयोग्य. अशा क्रमानें तुझें राज्य फार लौकर लयास जाईल. ज्याचे हेर, भांडागार व न्याय यथास्थित नाहीं, त्या राजाला पामर म्हणतात. जो राजा तीक्ष्णस्वभावी, अल्पदानी, अभिमानी व पराधीन असतो, त्याला संकटकाळीं कोणी आश्रय देत नाहींत. जो भूपति आपल्याच आळसानें असतो, जो स्नेह्यांचीं हितवचनें ऐकत नाहीं, फार क्रोधी, खऱ्या भीतीच्या वेळीं भीत नाहीं, आणि अवश्यकर्तव्यकर्में करीत नाहीं, तो राज्यभ्रष्ट होतो. त्याला अधमाधम दशा येण्यास वेळ लागत नाहीं.

**दशरथपुत्र-श्रीराम** धनुर्विद्याप्रवीण आहे. त्यानें माझी अशी दशा केली. तरी तुला कांहींच वाटत नाहीं? हें मोठेंच आश्चर्य !" **शूर्पनखे**च्या उत्साहप्रवृत्तिवाक्यांनीं **रावणास** नवा उत्साह आला. तो पुनः **मारीचा**कडे गेला; आणि सर्व वृत्तांत सांगून त्यानें त्यासही उत्साहित केलें. तेव्हां "मी मायावीपणानें सुवर्णमृगाचें रूप धरून **रामाश्रमा**कडे जातों; आणि युक्तिप्रयुक्तीनें **राम लक्ष्मणास** आश्रमापासून फार दूर नेतों, तितक्यांत तूं **सीता** हरण कर. संधि सांपडली तर मी **राम लक्ष्मणा**सही मारितों" असा संकेत करून दोघे दंडकारण्यांत आले.

**मारीच** सुवर्ण मृग-वेषानें दंडकारण्यांत आल्यावर मृगाप्रमाणेंच वागूं लागला. **सीतेनें** त्या मृगाला सहातांच तो **श्रीराम लक्ष्मणास** दाखविला. तेव्हां **लक्ष्मण** ह्मणाला, "असा मृग जगांत नाहीं. समर्थो हा एखादा मायावी राक्षस असेच!"

**लक्ष्मणा**कडून तो हरण आपल्यास मिळत नाहीं, असें पहातांच ती **श्रीरामास** "हा मृग मला जिवंत धरून द्या" असें नम्रतेनें व आग्रहानें मागूं लागली. तेव्हां निरुपायामुळें **श्रीराम** धनुष्यबाण घेऊन त्या मृगाच्या मागें लागला. त्या मायावी मृगानें अनेक रंग केले. क्षणांत तो अंतर्हित होई. पुनः दृष्टीस पडे, निमिषांत जवळ येई. क्षणांत दूर जाई. अशा धांवाधांवींत **श्रीराम** आश्रमापासून बराच दूर आला. पळांत तो हातीं लागेल असें दिसे; पण तितक्यांत फार दूर जाई. ह्या त्रासानें **श्रीराम** त्रासला; आणि त्यानें मृगास

ठार मारण्याचा निर्धार करून एक ... ज्वलंत बाण सोडतांच, तो मृग हा मारीच! "हा लक्ष्मणा! असे बोलून आणि स्वरानें ओरडून राक्षसरूपानें पतन पावला. रामानें आणखी एक मृग मारिला, आणि आश्रमाचा मार्ग धरिला.

रावणाची युक्ति सफल झाली. मारीच राक्षसाचा श्रीरामासारखा ध्वनि कानीं पडतांच सीता विव्हळ होऊन लक्ष्मणास सांगूं लागली. "प्राणनाथाचा प्राणांतासारखा ध्वनि आपण ऐकिला. समर्थी कांहीं तरी संकट असेल. तूं जा; आणि त्यांचा शोध घेऊन ये."

लक्ष्मणानें सीतेच्या भाषणाकडे विशेष लक्ष्य पुरविलें नाहीं व तो जाग्यावरूनही हालला नाहीं. त्यामुळें सीतेस फार कोप आला. ती ह्मणाली "तूं आपल्या बंधूचा मित्ररूपी शत्रु आहेस. केवळ मला भ्रष्ट करावी, इतक्याच हेतूनें तूं इकडे आलास. नाहींतर श्रीराम संकटावस्थेंत आहे, असें तुला समजतांच तूं जातास." असें बोलून सीता मोठमोठ्यानें रडूं लागली. तेव्हां लक्ष्मणानें तिला सांगितलें "अखिलब्रह्मांडांत श्रीरामाशीं युद्ध करून जय संपादन करील, असा कोणीच नाहीं. तुला हें बोलणें उचित नव्हे. आतां श्रीराम मृगास घेऊन येईल. मी तिकडे गेलों असतों; पण अशा प्रसंगीं व अशा स्थलीं तसें करणें चांगलें नव्हे; इतक्याकरितांच गेलों नाहीं."

सीता संतापानें ह्मणाली "अरे, तुझ्यासारखा दुर्बुद्धि बंधु पापमति असला, तर त्यांत कांहीं नवल नाहीं. निःसंशय तूं भरताच्या प्रेरणेनें किंवा स्वतःच

केवळ मला धर्मभ्रष्ट करण्याच्या उद्देशानें एकटाच इकडे आला आहेस. दुसरें कांहीं नाहीं. पण, तुझी दुष्टधारणा पार पडणार नाहीं. तुला वाटेल असेल तर वाटो, पण मी तुझा आमरण आश्रय करणार नाहीं "

लक्ष्मणास सीतेच्या वाक्प्रहारानें मरणप्राय दुःख झालें. तो ह्मणाला " स्त्रियांचा स्वभावच असा. मी तुला कल्याणाचा मार्ग सांगितला. पण, तूं आपल्या जातीस्वभावावर गेलीस आणि व्यर्थ मला कठोर शब्द बोललीस. मी श्रीरामाच्या आज्ञेप्रमाणें वागत असून तुला खोटा संशय आला. धिःकार असो. मी श्रीरामाकडे जातों. वनदेवता तुझें रक्षण करोत. " असें सांगून परम दुःखितांतःकरणानें तो आश्रमांतून निघाला.

इतक्यांत ब्रह्मचाऱ्याच्या वेषानें लंकापति आश्रमाच्या द्वारीं आला व सीतेस घेऊन चालता झाला. जातां जातां सीतेनें रडून फार दुःख केलें; परंतु त्याचा उपयोग काय ! सीतेला बरेंच दूर नेल्यावर जटायु अकस्मात तिच्या दृष्टीस पडला. त्याला तिनें " रावणानें माझें हरण केलें, असें श्रीरामास सांग. " इतकें मोठ्यानें ओरडून सांगितलें.

जटायु स्वस्थ पडला होता. त्यानें सीतेचें आकांत-वचन ऐकून तिजकडे पाहिलें आणि रावणास सांगितलें " अरे, असें निंद्य कर्म करणें तुला योग्य नाहीं. तूं सीतेला सोड, नाहींतर मला तुजबरोबर युद्ध करावें लागेल. नीचा रावणा, पापी लोकांच्या हातीं फार दिवस संपत्ति रहात नाहीं. तुझा रामानें मुळींच अपराध केला नसून चोरासारखें

असें घोर कृत्य करणें, तुला शोभत नाहीं. आपलें शरीर थकणार नाहीं असें ओझें उचलावें. ज्या कृत्यांत धर्म अथवा कीर्ति नाहीं, असें कर्म कोण करितो? मी वृद्ध व निरायुध आहें; तूं तरुण व सायुध आहेस. विचार कर. माझ्या समक्ष **सीतेला** मी तुला कधीं नेऊं देणार नाहीं."

**जटायूचें** भाषण ऐकतांच **रावणराज** महाराजास फार क्रोध आला. आणि तो दात ओठ खात **जटायूशीं** संग्राम करूं लागला. दोन घडी घोरतर युद्धांत **रावणास** बरेच घाव पडले व **जटायूलाही** फार नुकसान आलें. **रावणानें** त्याचे पंख व पाय तोडून टाकले. **जटायु** विगलित होऊन जमिनीवर पडला. **सीता** त्याकडे गेली आणि त्याच्या अंगावरून हात फिरवून समाधानीच्या गोष्टी सांगूं लागली. इतक्यांत **रावणानें** तिला उचलून मांडीवर घेतलें व आपला मार्ग सुधारला.

**सीता, रावणास** पुष्कळ हितकारक गोष्टी सांगूं लागली; परंतु त्या पापमतीला त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. 'आतां आपली कठीण दशा' अशा विचारानें **सीता** विलाप करूं लागली. रडून रडून तिचे कमलनेत्र अनार्द्र झाले. तिचें सर्वांग कांपूं लागलें, दीर्घ श्वास निघूं लागला. आपल्या शोधास **श्रीराम** किंवा **लक्ष्मण** येत असेल काय? त्याची काय अवस्था असेल? इत्यादि अनेक विचारलहरींनीं तिची मति गुंग झाली. तरी आसमंतात आपलें रक्षण करणारा कोणी आहे कीं काय, हें ती पहात

होतीच. तेव्हां एका पर्वतशिखरावर पांच-सात वानर बसले आहेत, असें तिच्या अवलोकनांत आलें. तिनें आपल्या अंगावरील शेल्यांत पायांतील तोरड्या, कानांतील कुडी इत्यादि अलंकार बांधून त्या वानरांवर टाकिले.

**रावण** **सीतेस** घेऊन निघाला. तो मार्गांत आणखी कोठें न थांबतां तडक **लंकेस** पोंचला. त्यानें **सीतेस** आपल्या अंतःपुरांत ठेविलें, आणि कित्येक भयंकर राक्षसीस बोलावून सांगितलें " माझ्या आज्ञेशिवाय कोणाल्याही इकडे येऊं देऊं नका. आणि ही जें कांहीं मागेल, तें तुम्ही इला द्या. "

**श्रीराम** आश्रमांत येऊन पहातो तों **सीता** नाहीं. त्याच्या मनांत नाना तरंग येऊं लागले. तो **सीतेच्या** शोधाकरितां आश्रमांतून निघाला. इतक्यांत **लक्ष्मणही** त्यास भेटला. **श्रीरामास लक्ष्मणानें** सर्व वृत्तांत सांगितला. तेव्हां दुःखाश्रूंनी त्याचें सर्वांग भिजून चिंब आलें. तो वेड्याप्रमाणें **आक्रंदन** करूं लागला. त्याला आपल्या देहाचेंही भान राहिलें नाहीं. वारंवार मूर्च्छा येऊं लागली. त्या वनांत जी जी वस्तु त्याच्या दृष्टीस पडे, तिला तो आलिंगन देऊन सजलनयन होत्साता **सीताशुद्धि** विचारूं लागला.

विलापदुःखानें दुःखित झालेला **श्रीराम** एका **वनांतून दुसऱ्या, दुसऱ्यांतून तिसऱ्या, " हा सीते! हा सीते ! " म्हणत उन्मत्तवत् भटकूं लागला. तो लक्ष्मणास वारंवार विचारी " सीता कोठें! तिची**

काय अवस्था ? **सीता** भेटणार नाहीं, तर मी फार दिवस वांचणार नाहीं. मी परलोकीं गेलों, तर पिता माझा धिक्कार करील. तो चौदा वर्षे पूर्ण झाल्याशिवाय कां आलास ? असें विचारील. त्याला काय समर्पक उत्तर देऊं ? पापी मनुष्यास सोडून जशी कीर्ति जाते, तशी मला सोडून **सीता** कशी गेली ? किती मी निर्दय ! **सीता** होती म्हणून मी राज्य-नाशाची, स्वजनवियोगाची, पित्याच्या मरणाची व मातेच्या वियोगाचीही चिंता बाळगीत नव्हतो. आतां मी काय करूं ? कोठें जाऊं ? **सीता** कोठें असेल ? तिचा शोध कसा लागेल ? आज सर्व दुःखें मूर्तिमंत माझ्यापुढें उभीं राहिलीं ! "

**लक्ष्मणानें** **श्रीरामाच्या** शांतवनाचे होतील तितके प्रयत्न केले, तरी त्याचें मन शांत होईना. **श्रीराम** प्रत्येक क्षणास नवे नवे तर्क वितर्क करी, आणि **लक्ष्मण** त्याचें कांहीं तरी उत्तर देई.

**रावणानें** **सीता** हरण केल्यावर **श्रीराम-लक्ष्मण** काय करितात ? हें समजण्याकरितां आठ राक्षस गुप्तरूपानें दंडकारण्यांत पाठविले. **सीता** बलात्कारानें वश करावी, असा त्याचा विचार होता. तो नेहमीं आपली प्रतिज्ञा तिला सांगे. बहुधा आत्मस्तुतींतच त्याचा बहुतेक वेळ जात असे. परंतु, पतिव्रता-श्रेष्ठ **सीता** तिकडे ढुंकूनदेखील पहात नव्हती. पति-विरहदुःखानें ती निःशक्त झाली. त्यांत विलाप व परिताप आणि **रावणाचे** हृदय-भेदक वज्रप्रहार, ह्यामुळें तिला मृत्यु येईल तर फार

चांगलें असें दि़ुं लागलें. **रावणानें** तिला एक वर्षाची मुदत दिली. आणि सांगितलें " दिलेल्या अवकाशांत जर तूं मला वश झाली नाहींस, तर मी तुझा वध करीन."

**सीता** ह्मणाली " अधमाधमा, तुझा विनाश-समय जवळ आला, ह्मणून तुला अशी वासना झाली. तूं मला कितीही दुःख दिलेंस, माझा वध केलास, तरी तुझा मी स्वीकार करणार नाहीं."

**श्रीराम, सीते**च्या शोधार्थ दक्षिणेकडे फिरत असतांना मरणोन्मुख **जटायू**ची व त्याची भेट झाली. जटायूनें त्याला घडलेली हकीगत सांगितली. ती एक-तांच, **श्रीराम** धाडकन भूमीवर पडला, आणि शोक करूं लागला. " हाय! हाय! किती मी अधम! **सीते**! तुला कष्ट देण्याकरितां मीं वनांत आणिली! देवा! राज्य गेलें! वनवास प्राप्त झाला! **सीता** गेली! आणि आमचा हितकर्ता मित्र **जटायु**ही चालला! काय मी दुर्दैवी! मागच्या जन्मीं मीं काय पातक केलें असेल तें असो. आतां माझी पुढें काय दशा होणार?"

" **रावणानें सीता** नेली." असें **श्रीरामास** सांगत असतांच **जटायु** गतप्राण झाला. त्याचा अग्नि-संस्कार करून **श्रीराम लक्ष्मणा**सह पुढें निघाला. नंतर **कबंधानें** त्यास सांगितलें " **सुग्रीवा**ची व तुमची भेट होईल, तर तुमचा कार्यभाग साधेल. **सुग्रीव** हा चतुर, बलवान, सत्यवक्ता, व नम्र आहे. तो **ऋष्यमूक पर्वतीं** रहातो."

असें समजतांच, सत्वरतेनें **श्रीराम** तेथून **पंपा** सरोवराचे कांठीं आला. **सुग्रीव**, **श्रीराम-लक्ष्मणाची** पौरुषसंपन्न व साधुवृत्ति पाहून साशंक झाला. त्यानें **हनुमान** नामक [illegible] प्रधानास **श्रीरामाकडे** शोधार्थ पाठविलें. [illegible] व **सुग्रीवाचें** फार वैमनस्य होतें. ' न [illegible], **श्रीराम** समर्थी **वाली**-कडूनच आला असावा. ' असा त्याला संशय होता.

**हनुमान** भिक्षुकाच्या वेषानें **श्रीरामाकडे** आला. आणि नम्रतेनें **श्रीरामास** विचारूं लागला " तुह्मी पराक्रमसंपन्न व **सूर्यासारखे** तेजस्वी पुरुष, ह्या भयंकर निबिड वनांत कां आलां ? हें कृपा करून सांगाल, तर मी आपला फार आभारी होईन. तुह्मी राज–तेज–संपन्न दिसतां. बरें, राजे ह्मणावें तर तुमचा तपस्व्यासारखा वेष दिसतो. ह्यामुळें कांहींच तर्क करितां येत नाहीं. तुह्मी कोणाला तरी शोधीत असाल, असें दिसतें. "

**लक्ष्मणानें** **हनुमानास** सर्व वृत्त सांगितलें. तेव्हां ह्यांच्या हातून आपलें काम होईल, असा **हनुमानानें** दृढ निश्चय केला व सांगितलें " **सुग्रीव** राज्य-भ्रष्ट झाला आहे. त्याच्या बंधूनें ( *वाळी* ) त्याच्या स्त्रीचें हरण केलें आहे. त्याचेच भयानें तो अशा भयानक जंगलांत रहातो. **सुग्रीव** **सीताशुद्धींत** तुमचें चांगलें सहाय करील. आतां आपण तिकडेच जाऊं. "

असें सांगून **हनुमानानें** भिक्षुकवेषाचा त्याग केला व वानररूप प्रकट करून **श्रीराम-लक्ष्मणास**

स्कंधावर बसवून तो क्षणांत ऋष्यमूक पर्वतीं आला. **हनुमानानें सुग्रीवाची** व **श्रीराम लक्ष्मणाची** भेट करविली, व त्यांचें सविस्तर वृत्तही सांगितलें. तें ऐकून **सुग्रीव** ह्मणाला "तुह्मी दोघेही धर्मात्मे, धीर—वीर, सत्पुरुष श्रेष्ठ, शूराग्रेसर व महान् पुरुष आहां. तुमच्या दर्शनानें मी आज कृतकृत्य झालों. आज माझें जन्माचें सार्थक्य झालें, असें मी समजतों. मी वानर असून तुह्मी मजशीं स्नेह करूं इच्छितां, ह्मणजे मला मान देतां असेंच मी समजतों. ज्या कार्याप्रीत्यर्थ तुह्मी मजशीं स्नेह करूं इच्छितां, त्याकरितां मी वचन देतों हें घ्या."

असें ह्मणत वचन देण्याकरितां **सुग्रीवानें** आपला हस्त पुढें केला. तेव्हां **श्रीरामांनी**ही पाणीपीडन करून हृदालिंगन दिलें.

**सीता** घेऊन **रावण** जात असतांना, तिनें अलंकार टाकल्याविषयींचें पूर्वी लिहिलेंच आहे. ते अलंकार ह्याच वानरास सांपडले होते. ते त्यानें **श्रीराम-लक्ष्मणापुढें** आणून ठेविले. **श्रीराम** ते पहातांच, ओळखून "हा **सीते**! प्रीय **सीते**! ह्मणून भळ भळ रडूं लागला, आणि रडत रडत **लक्ष्मणास** सांगूं लागला "**लक्ष्मणा, रावणानें सीता** नेली; तेव्हां तिनें जे अलंकार टाकिले ते पाहिलेस?"

**लक्ष्मण ह्मणाला "मी तिच्या पदकमलांचें नेहमीं दर्शन घेत असें; त्यामुळें हे पैंजण मात्र मीं ओळखले. हे तिचेच आहेत, ह्यांत शंका नाहीं. दुसरे अलंकार मला ओळखतां येण्याचें कांहींच साधन नाहीं. कारण, आज-**

पर्यंत तिकडे मीं पाहिलें नाहीं. आणि नपाहणेंच रास्त."

सुग्रीवानें स्वस्थिति सांगतांना म्हटलें "मी एक वानर आहे. माझीही स्त्री वालीनें नेली; परंतु मी असा शोक करीत नाहीं. तूं महात्मा व साक्षात् परमेश्वरस्वरूप असून, असा शोक करितोस हें तुला योग्य नव्हे. बुद्धिवंतांनीं धैर्य धरावें, हेंच त्यांस भूषण होय. संकट-काळ हा आकाशांतील अभ्राप्रमाणें आहे. गंभीरतेनें जें कार्य होतें, तें उतावळीनें होत नाहीं. माझ्या पुरुषार्थानें तूं निःसंशय रावणासह सर्व राक्षसांचा निःपात करून सज्जनांचें पालन करशील. शोकसमयीं वावरण्यांत कांहीं अर्थ नाहीं. शोकाचा त्याग कर--धैर्य धर--प्रयत्न कर--पुरुषार्थ कर. एकसारखें दुःख करीत राहिलें तर कधींच सौख्य मिळणार नाहीं. मी तुला सांगावें असा अर्थ नाहीं; परंतु मित्रभावानें सुचले ते चार शब्द सांगितले. त्याविषयीं तूं आपल्या मनास असंतोष होऊं देऊं नकोस."

मित्र-धर्म फार कठीण आहे. मित्र हा धनवान, दरिद्री, सुखी, दुःखी, निर्दोष, किंवा सदोष असो, तरी मित्राला शरणरूपच आहे. खऱ्या मित्राकरितां धन, सौख्य अथवा देशत्याग करावा लागला तरी चिंता नाहीं. जो उपकार करितो, तो मित्र व जो अपकार करितो तो शत्रु होय.

सुग्रीवानें श्रीराम-लक्ष्मणास सांगितलें "वालीनें मला अतिशय दुःख दिलें व तो अद्यापीही देत आहे. परंतु, हनुमानप्रभृति चार वानरांनीं फार दक्षतेनें माझें संरक्षण केलें. वाली बलवान आहे. त्याच्या मरणावरच माझ्या सुखाचा व जीविताचा आधार

आहे. माझा पिता मृत्यु पावला, तेव्हां त्यानें वालीस राजा केलें. वालीनें माझी स्त्री घेतली आणि मलाही राज्यांतून हांकून लाविलें. हल्लीं तो किष्किंधेंत थाटानें राज्य करीत आहे."

श्रीरामानें सुग्रीवास अभय वचन दिलें. नंतर सर्व सिद्धता करून ते ससैन्य किष्किंधेंत आले परस्परांचें घोर युद्ध चाललें असतां, सुग्रीव कोण व वाली कोण ? हांच श्रीरामास ओळख पटना. सुग्रीव, वालीकडून जर्जर होउन ऋष्यमूकीं आला. श्रीराम युद्ध सोडून तिकडेच गेला. तेव्हां वाली कोण व सुग्रीव कोण ? ह्याची ओळख पटण्याकारितां श्रीरामानें लक्ष्मणाच्या हातून सुग्रीवाच्या गळ्यांत नागपुष्पी नामक एक लता बांधविली. त्यामुळें चुकभूल होण्याचा संभव राहिला नाहीं.

श्रीराम सुग्रीव-सेनेसह पुनः किष्किंधेंत आल्यानंतर सुग्रीवाचें व वालीचें भयंकर समर झालें. त्यांत वालीनें सुग्रीवाच्या मस्तकावर मुष्टीप्रहार केला. त्यामुळें सुग्रीव रक्तबंबाळ झाला. थोडयाच वेळांत तो थकला व संरक्षणेच्छेनें श्रीरामाकडे दीनवदन पाहूं लागला. श्रीराम तेव्हांच त्याचा हेतु समजले. त्यानें एक बाण मारून वालीस मरणोन्मुख केलें. वाली पडला. श्रीराम-लक्ष्मण त्याला पाहण्याकरितां समीप गेले. प्राणांतसमयीं क्रोधसंतप्त होउन वालीनें श्रीरामास विचारिलें " श्रीरामा, तूं कुलीन, सत्पुरुष व योग्यायोग्य पाहणारा आहेस; असें लोकवार्ता सांग-

ते. पण, तूं पातकी, निर्दय, धर्मठग, व मिथ्याधर्मवेषी आहेस असें तुझ्या आतांच्या कृतीवरून दिसतें. अरे, क्षत्रियकुलोत्पन्न, तपस्वी, वेषधारक व महात्मा असें निष्ठुर कर्म करील असें मला दिसलें नव्हतें. महात्म्या दशरथाच्या उदरीं तुजसारखा शठ, क्षुद्र, अपकारी पुरुष कसा जन्मला देव जाणे. तुझें व माझें शत्रुत्व किंवा मित्रत्वही नाहीं. मजवर तूं विनाकारण स्वपराक्रमाचा प्रकाश पाडिलास. तथापि, सीताहरण करणाऱ्या रावणाकडे वक्र दृष्टीनें पहाण्याचेंही तुला अद्याप सामर्थ्य आलें नाहीं. एखाद्या झोंपलेल्या मनुष्यास सर्पानें दंश करावा: त्याप्रमाणें तूं अन्यायाचरण केलेंस. ज्या स्वार्थाकरितां तूं सुग्रीवाच्या सांगण्यावरून माझा प्राण घेतलास. तो प्रथमच मला सांगतास तर मीं एका क्षणांत तुझें कार्य सहज केलें असतें. मीं एका निमिषांत रावणास धरून आणून तुजपुढें ठेविलें असतें. सुग्रीवास राज्य मिळणें स्वाभाविक आहे. परंतु, अधर्मानें तूं मला मारिलेंस, हा तुझ्या कपाळचा जन्मोजन्मीं कलंक जाणार नाहीं! मला मरणाची मुळींच भीति नाहीं. पण, तुझें ह्या कृत्याविषयीं काय मत आहे, तेंच मला ऐकावयाचें आहे."

श्रीरामानें प्रांजळ मनानें सांगितलें "धर्म, अर्थ व लोकपद्धति ह्यांचा विचार केल्याशिवाय केवळ मूर्खत्वानें तूं माझा धिक्कार केलास. असो, ही सर्व पृथ्वी इक्ष्वाकु कुळाची आहे. तिजवर जे अपराध करितात, त्यांस शिक्षा करणें हें आमचें काम आहे. तूं नीचकर्मा, धर्मोल्लंघक व काम-भोगासच पुरुषार्थ मानणारा

आहेस. तुला राजपद्धति माहीत नाहीं. जी झाली तीच देहांत शिक्षा तुला योग्य होय."

"काय मागूं? असो. झालेल्या अपराधाची क्षमा कर आणि माझ्या **अंगदाचें** संरक्षण कर. तो बालक आहे. जसा **सुग्रीव** तसाच **अंगद** समज आणि **सुग्रीव, तारेचा** अपमान करणार नाहीं इतकी व्यवस्था ठेव म्हणजे झालें." असें वाळीनें सांगितलें.

**श्रीराम** म्हणाले "दैवगति विचित्र आहे. तूं शोक, मोह, व भय यांचा परित्याग कर. **सुग्रीवाप्रमाणें** किंवा तूं जसें करीत होतास तसेंच मी **अंगदाचें** रक्षण करीन."

**श्रीराम**शरविद्ध होऊन **वाळी** पडला असें समजतांच, **तारेनें** फार शोक केला. ती समरंगणीं येऊन **वाळीस** आलिंगून आक्रोश करूं लागली. **अंगद**ही तेथें आला त्याचें रक्षण करण्याची **वाळीनें सुग्रीवासही** विज्ञापना केली व **अंगदास** सांगितलें "**अंगदा**, सुखाचा हर्ष व दुःखाचा शोक करूं नको. देशकालावर दृष्टी दे. माझी सेवा करीत नव्हतास, तरी त्याविषयीं मला कांहींच वाटलें नसतें; पण **सुग्रीवाकडे** तसें वर्तन ठेवशील, तर तो तुजवर प्रेम ठेवणार नाहीं. राजा, अग्नि, गुरु व स्त्री यांच्या विशेष सान्निध्यानें विनाश होतो व फार दूर राहिलें तर कांहींच अर्थ होत नाहीं." असें बोलतां बोलतां **वाळी** निचेष्टित पडला.

**तारा** शोकविव्हल झाली. **सुग्रीवासही** वैराग्य उत्पन्न झालें. परंतु **श्रीरामानें** सर्वांचें सांतवन केलें, **सुग्रीवास** राज्याभिषेक केला व **अंगदास** युवराज नेमिलें. **हनुमान, नीळ, जांबुवान** व **गंधमादन** वगैरे

मंत्री सुग्रीवाची आज्ञा फारच दक्षतेनें वंद्य करूं लागले. सुग्रीवाची स्त्री रुमाही त्यास मिळाली व वाळीची स्त्री तारा किष्किंधेंत शांतपणानें राहूं लागली.

नंतर श्रीराम ऋष्यशृंगावरील प्रस्रवण प्रदेशांत राहिला. त्याचें चित्त सीतेच्या चिंतेनें निमग्न असे. सुग्रीवास स्त्री, राज्य, व कीर्ति मिळाली, ह्याच आनंदांत तो निमग्न होता. श्रीरामास त्यानें जें वचन दिलें होतें, तें जसें काय त्याच्या ध्यानांतच नव्हतें. एकदां हनुमानानें त्यास सांगितलें " समयीं प्रत्युपकार जाणून जो मित्राशीं वागतो, त्याचें राज्य, यश व प्रताप हीं वृद्धिंगत होतात. मित्रकार्यांत जो अनास्था करितो, तो अनर्थांनीं घेरिला जातो. वेळ गेल्यानंतर कोणाचेंही काम केलें, तरी तें न केल्याप्रमाणेंच होतें. मी सांगावें असें नाहीं; परंतु श्रीराम तुम्हांवर विश्वास ठेवून आहे इतकें ध्यानांत असोंद्या म्हणजे झालें. कारण, तुमचा मित्र श्रीराम अपारप्रभाव व सद्गुणसंपन्न आहे. तो त्रैलोक्यविजयी आहे. त्याला आमच्या सहायाची विशेष अवश्यकता आहे असें नाहीं; पण न जाणो तो आपलें मन पाहाणार नसेल कशावरून ! "

सुग्रीवास हनुमानाचें सांगणें सत्य वाटलें.त्यानें नील सेनापतीस " पंधरा दिवसांत सर्व सेना सिद्ध करा " असें सांगितलें. आणि तो विलासमंदिरांत जातांच सर्व विसरला. " मनोमन ईश्वर साक्ष " ह्या न्यायानें श्रीरामासही सुग्रीवाची आमच्या कामीं अनास्था आहे असें वाटून त्यानें लक्ष्मणास सुग्रीवाकडे पाठविलें तारेनें व हनुमानानें त्याची समजूत घातली. लक्ष्मण

शांत मनानें श्रीरामाकडे आला. सुग्रीवानें सीता कोठें आहे हें पहाण्याकरितां मोठमोठ्या वानरांस जिकडे तिकडे पाठविलें. त्यांत हनुमानावर त्याचा फार विश्वास होता. त्यास त्यानें सांगितलें " तूं महा बलवान, चतुर, स्वकार्यदक्ष, बुद्धि-उत्साह-संपन्न व देश-काल-ज्ञानी आहेस. एतदर्थ हें काम काळजीनें कर " श्रीरामानें हनुमानाकडे आपल्या हातांतील एक आंगठी देऊन सांगितलें कीं " ही मुद्रिका पाहील तर तूं मजकडून आला आहेस असें सीता ओळखील. "

सीताशुद्ध्यर्थ निघालेल्या वानरसेनेपैकीं अंगदाची व गृध्रपती जटायूच्या कनिष्ट बंधु संपातीची गांठ पडली.

त्यानें " सीता रावणानें लंकेत नेली " असें सांगितलें. तेव्हां सीतेचा शोध लागला अशा समजानें अंगदप्रभृति सर्व वानरांस फार आनंद झाला. ते हर्षानें नाचूं लागले आणि तशाच स्थितींत समुद्रापर्यंत आले. तेथें त्यांचे हात, पाय व उत्साह एकदमच गळला! आतां कसें करावें? हाच प्रत्येकाच्या मनांत विचार घोळूं लागला. अंगदानें त्यास धीर दिला. तो ह्मणाला " अहो, खेद फार वाईट. तो पुरुषास मारितो. जो उत्साह सोडून खेदवश्य होतो, त्याचें तेज क्षीण होतें व पुरुषार्थही सिद्ध होत नाहीं. धैर्य धरा. तुह्मांपैकीं कोण समर्थ आहे ? सांगा. हा शत योजन समुद्र कोण उल्लंघन करूं शकेल ? "

सर्व वानरांनीं आपआपली शक्ति सांगितली. त्यांत जांबवानानें ( आस्वलांचा राजा ) आपण वृद्ध झालों आहें, एतदर्थ नव्वद योजनें उडी मारीन. पूर्वीं यापे-

क्षांही जास्त मी उडी मारीत होतों. आतां उडी मारीन, पण मागें येईन किंवा नाहीं हें सांगवत नाहीं. असेंही सुचविलें. बराच वेळ भवति न भवति झाल्यावर हनुमानानें समुद्रउल्लंघन करावें, असें ठरून त्यानें आपला देह विस्तृत केला; आणि एका उड्डाणांत तो समुद्राची मौज पहात व उच्छृंखल करीत लंकेतील त्रिकूटाचलावर उतरून लंकेची रचना पहात थोडा वेळ बसला.

तेव्हां लंका नगरी अवर्णनीय होती. रावणानें सीतेस तेथें आपल्यापासून चांगला बंदोबस्त ठेविला होता. आपण विशाल देहानें गेलों तर राक्षस तेव्हांच ओळखतील व आपल्या कामाचा विचका होईल, असा विचार करून हनुमानानें सामान्य वानरस्वरूप धारण केलें. आणि रात्रीं लंकेंत प्रवेश केला. तेव्हांच्या थाटाचें लंकेचें कोण वर्णन करील! जिकडे पहावें तिकडे गीत-वाद्य चाललीं होतीं. हास्य-विनोदादि क्रीडांस तर सीमाच नव्हती. कोठें सिंहनाद, कोठें वेदघोष, कोठें रावण राजाची स्तुति चालली होती. जिकडे तिकडे आज्ञा होतांच काळासही ओढून आणण्यास सिद्ध अशी प्रबल सेना सज्ज होती. चंद्रोदय झाला. हनुमानास ती एक सहायताच झाली. तो कोठें सुस्वर वीणा वादन ऐकत व कोठें स्त्रीपुरुषांचे विहार पहात, पुढें निघाला. तेथें मद्यप्राशनप्रमत्त राक्षस बडबड व धांदल करीत होते. त्यापुढें कित्येक स्त्रिया स्वपतीच्या अंगास चंदनादि सुगंध लेप कोमल हस्तांनीं लावीत होत्या. कित्येक स्त्रिया पुरुषांस हटा-

लिंगन देऊन स्वस्थ पडल्या होत्या. कित्येक हंसत होत्या. व कित्येक मानी स्त्रिया दीर्घ निश्वास सोडीत पतीवर रागावून बसल्या होत्या. अनेक घरांतील अनेक तऱ्हा. त्या सर्वांची स्थिति सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

पुढें गेल्यावर पुष्पक विमान त्याच्या दृष्टीस पडलें. विजेनें जसा मेघ शोभतो, त्याप्रमाणें तें विमान सुंदर स्त्रियांनीं परम शोभिवंत दिसत होतें. जसें आकाश ताऱ्यांनीं शोभायमान दिसतें, त्याप्रमाणें तें अमोल्य रत्नांनीं परिशोभायमान दिसे. त्यांत मौल्यवान हिऱ्यांचे पर्वत केलेले होते. त्यावर वृक्ष होते. वृक्षांवर अपूर्व पुष्पांची रचना होती. त्यांवरील बारीक केसर व पाकळ्या तर इतक्या चातुर्यानें केल्या होत्यां कीं, तें पुष्प पहातांच सुगंधार्थ काढून घ्यावें असें कोणासही वाटलें असतें. प्रफुल्ल सरोवरांची व उपवनादिकांची अद्भुत रचना होती. तेथून जवळच मन आनंदीत करणारा सुगंध येत होता. त्या शाळेंत हनुमान उतरला. त्या मनोरम मंदिराच्या पायऱ्या अमोल्य रत्नांच्या होत्या. रत्नतेजाच्या चकचकाटानें तें सुगंधालय पंचेंद्रियांचें शांतवन करीत होतें. त्यांत अनेक सुंदरी रहात असत. तेंच रावणाचें शयनागार. त्यांत रावण स्वस्थ घोरत अस्ताव्यस्त पडला होता. त्याच्या शेजारीं त्याची पट्टराणी मंदोदरी झोंपली होती. तिचें मनोहर सौंदर्य पहातांच हनुमानास हीच सीता असेल असा भास झाला. तितक्यांतच सीतेच्या पतिनिष्ठेची व पातिव्रत्याची स्मृति झाली. असो. अशोक वनाशिवाय

सर्व लंका नगरी धुंडाळल्यावर हनुमानानें स्वमना-शींच कितीएक तर्क केले. नाना तऱ्हेच्या कल्पना चालविल्या. पण, सीतेचा शोध लागेना. शेवटीं तो अशोक वनांत आला.

त्या वनाची शोभा पहातांच हनुमानास विस्मय झाला. तेथें लहानमोठे अमृत जलाचे पाट चित्रविचित्र आकृतींनीं सुशोभित दिसत. ते मोत्यांनीं व रत्नांनीं शानदार बांधले होते. वनांतील कित्येक वृक्ष सुवर्णाप्रमाणें व कित्येक अग्निज्वालांप्रमाणें चकाकत असत. जिकडे तिकडे लहान मोठे चमत्कारिक वृक्ष असून कित्येकांवर सुंदर लता लटकत होत्या. त्यांत पर्वताप्रमाणें उंच, कैलासासारखा शुभ्र आणि प्रवाळांच्या पायऱ्यांनीं शोभिवंत केलेला एक महाल हनुमानानें पाहिला. तो पुढें जाऊन पाहूं लागला तेव्हां चंद्रवदनी चारुगात्री एक सुंदरी शोक–ध्यान–दुःखानें दुःखित झालेली आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. तिच्या समंतात पुष्कळ राक्षसी बसल्या होत्या. पहांट होईपर्यंत हनुमान सीतेचा शोध करीत होता.

पहांट होतांच लंकेतील कित्येक राक्षस वेदपठण करूं लागले. बंदीजनांनीं स्तुतिपाठ चालविला. वाद्यध्वनीनें रावणही जागृत झाला. जिकडे तिकडे राक्षसांचा कलकलाट सुरू झाला. जो पहावा तो आपआपल्या उद्योगास लागलेला. सीता पतिचिंतन व शोक करूं लागली. ती ह्मणाली " देवा ! मी सनाथ असून अनाथ झालें ! जे प्राणी भाग्यवंत तेच श्रीरामाचें पवित्र दर्शन घेतील. मी हत भाग्य ! मी दुर्दैवी !

म्हणून मला अशा यातना सोसाव्या लागत आहेत. मी पूर्वजन्मीं काय दारुण पातक केलें होतें त्याचें हें फळ मी भोगीत आहें. या मनुष्यजन्मास धिःकार असो ! **श्रीराम** दयाळु आहे; परंतु माझ्या भाग्यक्षयामुळें त्याला माझी विस्मृति पडली असेल. मी इकडे दुःखानलांत पोळत आहें हें तरी त्याला समजलें असेल किंवा नसेल प्रभु जाणें ! ह्या दुष्ट दुर्मति निशाचरींनीं तर माझा छळच मांडिला आहे. देवा ! तुला दीनवत्सल म्हणतात; परंतु माझी दया तुला कां येत नाहीं ? या तापत्रयापेक्षां मरण येईल तर फार चांगलें. **रावणाची** मुदत संपत आली. तो अधर्मी आहे. लंकेंत भयंकर उत्पात होवो. ह्या अधमाधमाची राख रांगोळी होवो. **श्रीरामास**—माझ्या परम प्रिय प्राणनाथांस ज्ञानवैराग्यामुळें माझा विसर पडला नसेल ना ? जें मनुष्य दृष्टीसमोर असतें, त्यावर कोणाचीही प्रीति असते. पण, तें दृष्टीआड झालें कीं, ती प्रीतीही कमी होते. असें म्हणतात तें खरें. परंतु, कृतघ्नाचें हें कर्म. माझा प्रियकर **श्रीराम** कृतज्ञ आहे. तो माझी कां उपेक्षा करीत असेल ? शत्रु हें हिंमेचें मूळ कारण असें मनांत आणून **श्रीराम लक्ष्मणानें** त्याचा परित्याग तर केला नसेल ना ? न जाणो, चांडाळ पापमूर्ति **रावणानें** त्यांचा घात तर केला नसेल ? हाय हाय ! आतां मी काय करूं ? कोठे जाऊं ? माझें सतीत्व संरक्षण कसें होईल ? ईश्वरा ! मला मरण तरी दे रे ! या यातना, अशा दीन, निराधार, दुःखि, संकटग्रस्त अबलेस सहन होत नाहींत. धीर तरी कोणाच्या आशेवर

आणि किती दिवस धरूं ? आत्मघात करूं ? शिव शिव! त्यासारखें महान पाप नाहीं. असें पुरुषश्रेष्ठ ह्मणतात. करूं तरी काय ? खरेंच, जगदीशा! आता हा जीवलोक नकोसा झाला. कसा तूं सर्वज्ञ मलाच पापिणीला विसरलास ? काय माझें बलवत्तर दैव!"

सीता शोक करूं लागली की, तिजवर रक्षक असलेल्या व तिला अनुकूल करण्याकरितां ठेविलेल्या राक्षसी फार पीडा देत. केवळ त्रिजटा मात्र तिजवर प्रीति करी. असो. हनुमानानें सीतेस ओळखतांच सांगितलें " माते, सदाचार-संपन्न व स्वजन-प्रतिपालक श्रीरामाकडून मी आलों आहें. मला हनुमान असें ह्मणतात. श्रीराम लक्ष्मण कुशल आहेत. त्यांनीं तुझें कुशलवृत्त विचारण्याकरितां मला पाठविलें आहे.

श्रीराम-लक्ष्मणाचें कुशलवृत्त ऐकून सीतेस आनंद झाला. तितक्यांतच तिच्या मनांत नाना तरंग उद्भवले. शेवटीं हा हनुमान वेषधारी रावणच असावा, असेंही तिच्या मनांत आलें. तेव्हां हनुमानानें आपण लंकेंत येईपर्यंतचें सकल वृत्त श्रीराम--स्वरूप--वर्णन यथातथ्य सांगितलें. आणि आपण श्रीराम--दूत खरा, अशी तिची खात्री पटण्याकरितां श्रीरामानें त्याकडे जी मुद्रिका दिली होती, तीही सीतेकडे दिली व आपल्या अत्यद्भुत शक्तीचीही गोष्ट सांगितली. सीतेला स्कंधावरून नेण्याची तयारी व उत्सुकतेचा प्रभाव दाखविला. परंतु, भावी विपर्त्तीचा विचार करून तो बेत त्यास एकीकडे ठेवणें भाग पडलें. नंतर हनुमान सीतेशी

आज्ञा घेऊन श्रीरामाकडे यावयास निघाला. तेव्हां **सीतेनें** त्यास खुणेकरितां एक शिरोभूषणही दिलें.

**हनुमान सीतेची** आज्ञा घेऊन निघाला. तेव्हां राक्षसांचें व आपलें बलाबल किती आहे हें पहावें व शत्रूचें जातां जातां कांहीं तरी अनहित करून जावें, असा त्या करणशास्त्रपटूनें मनांत विचार आणून **लंकेंतील** मोठमोठे वाडे, मंदिरें व वृक्ष धुळीस मिळविले. अशोक वनाचा तर सर्वांशींच विध्वंस उडविला. **रावणा**स हें वर्तमान समजतांच त्यानें किंकर नांवाचे ऐंशीं हजार राक्षस **हनुमानास** शिक्षा करण्याकरितां पाठविले. त्यांनीं **हनुमानास** वेढिलें. तेव्हां **हनुमान** " **श्रीराम-लक्ष्मण व सुग्रीव** राजाचा सदैव विजय असो " असें मोठ्यानें ओरडून भुभुःकार करीत सांगूं लागला " मी **श्रीराम-दूत हनुमान** आहें. एका **रावणासच** कां हजारों **रावणास** मीं एकटा समरंगणप्रसंगीं ठार मारीन, असा माझा अतिशय अलौकिक पराक्रम आहे." असें सांगत त्यानें **सीतेस** प्रणाम करून आपला भव्य देह विस्तारिला व भयंकर सिंहनादानें आकाशपाताळ एक करून सोडिलें. तितक्यांत **जंबुमाली** ह्या नांवचा एक वीरश्रेष्ठ राक्षस त्याशीं युद्ध करूं आला. **हनुमान** उड्डाण करून एका मोठ्या मंदिरावर बसला. त्यानें **रावणमंदिराची** क्षणांत राखरांगोळी केली. **जंबुमालीस** ठार मारिलें. व '**श्रीराम तुम्हांशीं युद्ध करावयास लौकरच येईल**' अशी सूचना देऊन तो उड्डाण करूं लागला. तितक्यांत संधि साधून त्यानें मुष्टिप्रहारानें व नखांनीं कित्येक राक्षस गतप्राण केले.

**हनुमानानें** किंकरांचा व मंत्र्याच्या सात पुत्रांसह इतर अनेक सैनिकांचा संहार केला. हें वर्तमान **रावण**-राज महाराजास समजतांच त्याच्या पोटांत भीति पड-ली. तरी त्यानें धीर धरून **विरूपाक्ष, यूपाक्ष, दुर्धर्ष, प्रघस** व **भासकरण** नामक पांच सेनापतींस ससैन्य **हनुमानाशीं** समर करण्यास पाठविलें; आणि ' त्यास ठार मारा, नाहीतर होतां होईल तितके श्रम करून धरून तरी आणा ' असें सांगितलें.

पांचही सेनापति प्रबळतर वेगानें व धैर्यानें आपल्या अंगावर येत आहेत, असें पहातांच **हनुमानानें** आपला देह अवाढव्य वाढवून गगनमंडळ परिकंपायमान कर-णारा भुभु:कार करून आकाशांत उंच उड्डाण केलें, व तो एकदम पर्वत कोसळल्याप्रमाणें राक्षस सैन्यावर प-डला. त्या तडाक्यांत दुर्धर्षासह कित्येक रात्रिंचर चेंग-रून ठार मेले व कित्येक जर्जर होऊन अकाळ विकाळ ओरडत पडले. **हनुमानानें** एक अजस्र वृक्ष उपटून घेऊन **विरूपाक्ष** व **यूपाक्ष** ह्यांस एका तडाक्यांत ठार मारिलें व **प्रघस** आणि **भासकरण** ह्यांस बाया-ळ केलें. फारच थोडे निशाचर पळाले. समर्थी ते आण-खी कोणास तरी घेऊन येतील, तर त्यांचाही पाठारा उडवावा अशा विचारानें **हनुमान** कांहीं वेळ विश्राम घेत बसला.

इतक्यांत **रावणाचा** कनिष्ठ पुत्र **अक्षकुमार** समर-सिद्धतेनें तेथें आला. तो फारच पराक्रमी, अभंगोत्साही व शक्तिसंपन्न होता. त्याबरोबर सैनिक निशाचरही पुष्कळ होते. त्यांस पाहून **हनुमानानें** रणगंभीर घन-

घोर गर्जना केली; आणि सपाट्याबरोबर **अक्षकुमाराचे** पाय धरून त्याला गरगर फिरवून एकदां जमिनीवर आपटलें. त्याबरोबर त्याच्या देहाचा चुराडा होऊन तो यमालयीं गेला.

**अक्षकुमारानंतर इंद्रजित हनुमानाशीं** युद्ध करूं आला. तो शस्त्रास्त्र-विद्या-कुशल. धीर, गंभीर. तपोबल व भुजबलरक्षित व बुद्धिमान होता. त्याच्या रथाचा घोर शब्द ऐकतांच **हनुमानाच्या** अंगावर रोमांच थरारले. **इंद्रजितानें** अमाप बाणवर्षाव केला. **हनुमानही** चांगल्या धैर्यानें व युक्तीनें युद्ध करूं लागला. तरी **इंद्रजितानें** ब्रह्मास्त्रांचा प्रयोग करून **हनुमानास** बांधिलें आणि **रावणाकडे** नेलें.

तेव्हां **प्रहस्त** मंत्र्यानें त्याला विचारिलें " तूं कोण, **कोठून** आलास व कां आलास तें खरें सांगशील, तर सुटशील. नाहींतर प्राणास मुकशील. "

" मी जातीचा वानर. केवळ **रावणराज**-दर्शनार्थ रूपांतर करून येथें आलों. **दशवदनाचें** दर्शन होण्यास दुसरें कांहीं साधन नाहीं. इतक्याकरितांच मला वनविध्वंस करावा असें वाटून मीं तसें केलें. आणि मला मारावयाला जे राक्षस आले, त्यांचा आत्मसंरक्षण करीत असतां मला संहार करणें भाग पडलें.मी **सीता**-शुद्धि करितांच इकडे समुद्रोल्लंघन करून आलों. **रावणा**, बुद्धिमान पुरुष समूलनाशक पर-दारा-हरण कधीं करीत नाहींत. अरे, तपोबलसामर्थ्यानें तुला जें अपार ऐश्वर्य व आयुष्य मिळालें आहे, त्याचा परस्त्री परिग्रहरूप अधर्मानें विनाश करूं नको. तूं सीतारूप काळपा-

शत्रूंचें म्हणण्यांनी स्वकंठीं घालून घेतलास. आत तरी विचार कर. आणि सीतेस श्रीरामाकडे पोंचीव. नाहींतर तिच्या पातिव्रत्यरूप प्रखर तेजानें आणि सदाचरणी, सत्यवचनी, नरवीरश्रेष्ठ रामाच्या प्रकोपाग्नीनें तुझ्या धन-कनक संपन्न सुशोभित लंका नगरीचा विध्वंस होईल; आणि त्यांत तुझ्या कुलाची व पराक्रमसंपन्न अनेक वीरांची राख-रांगोळी उडेल. ज्याचें दैव किंवा काळ फिरतो, त्याला दुर्बुद्धि सुचावयास वेळ लागत नाहीं. आणि एकदां दुर्बुद्धि सुचली कीं, तिचा परिणाम फार काळ भोगावा लागतो."

रावणाचा प्रकार हा तसाच झाला. हनुमानाचें हितकर व मधुर भाषण त्याला मुळींच आवडलें नाहीं. उलट तो क्रोधास चढला. त्यानें हनुमानास ठार मारण्याचा निश्चय केला. परंतु, त्या कामीं रावणाच्या कनिष्ठ बांधवानें बिभिषणानें अनुमत दिलें नाहीं. त्यानें सांगितलें "कार्यांतील उत्कर्ष किंवा अपकर्ष ज्ञात राजे दूतांचा वध कधींच करणार नाहींत. ह्या वानराचा वध करणें हें धर्म व लोकसंप्रदायविरुद्ध आहे. तुमच्यासारखे शास्त्रज्ञ पुरुष जर क्रोधवश्य झाले, तर शास्त्राभ्यास-परिश्रम व्यर्थ असें म्हटलें पाहिजे. एतदर्थ तुम्हांस वाटेल तर त्या दूतास अल्प शिक्षा करून सोडून द्या. स्वामीची आज्ञा निवेदन करण्यास आलेल्या दूतास मारूं नये असा सत्पुरुषांनी निर्णय ठरविला आहे."

रावणास बिभिषणाचें भाषण रुचलें. त्यानें 'हनुमानास विरूप करून नगरांत फिरवा व सोडून द्या.' अशी आपल्या सेवकांस आज्ञा केली.

**रावणाज्ञा** होण्याचा अवकाश, तेव्हांच जुन्या वस्त्रांचे ढीग पडले. तीं वस्त्रें **हनुमानाच्या** पुच्छास गुंडाळलीं आणि लौकर पेटावीं ह्मणून त्यावर तेल व शीघ्रज्वालाग्राही पदार्थ चोपडून त्यांस अग्नि लाविला. तीं वस्त्रें चांगलीं पेट घेतांच कित्येक राक्षस वाद्यें वाजवीत **हनुमानाची** धिंड काढूं लागले. त्याबरोबर **हनुमानानें** आपलीं सर्व बंधनें पटापट तोडून टाकिलीं, बरोबरच्या राक्षसांचा वध केला, आणि प्रत्येक घरावर उडी मारून बहुतेक **लंका** नगरी अग्निनारायणाच्या भक्षस्थानीं बळी दिली. जिकडे तिकडे कल्पांत-भास झाला. हाहाःकारानें दशदिशा दणाणल्या. " हा वानर नव्हे, अहो प्रत्यक्ष काळ!" असेच सर्वांचे उद्गार निघूं लागले. **लंकेंत** घोर आकांत सुरू झाला.

**लंकेंत** अग्निप्रळय करून **हनुमान** समुद्रतीरीं आला. सागरांत त्यानें आपलें पुच्छ विझविलें. त्याचें अद्भुत कृत्य पाहून देवता, सिद्ध, गंधर्व ह्यांसही विस्मय झाला. आपण अलौकिक व धनधान्य परिपूर्ण **लंका** नगरी जाळली हें चांगलें केलें नाहीं; असें त्याच्याच मनास वाईट वाटूं लागलें. तो ह्मणाला " प्रदिप्तकोप विचारशक्तीनें महात्म पुरुष शांत करितात. क्रोधी पुरुष गुरुजनांचीही हत्या करण्यास चुकणार नाहीं. तो दुर्वचनांनीं सज्जनांचाही एका क्षणांत धिःकार करील. क्रोध सर्व पातकाचें मूळ ह्मणतात तें खरें. आपल्या बुद्धीच्या मोहानें विनाकारण सर्व कामाचा घोंटाळा तर होणार नाहीं ना? वानरांचा जातिस्वभाव अनवस्थित ह्मणतात त्यांत कांहींच शंका नाहीं. माझ्या उतावीळ स्वभावास धिःकार

असो. सीतेला ह्या कृत्यापासून कांहीं पीडा होणार नाहींना! छी: तिचें पातिव्रत्यच तिला सुरक्षित ठेवील! अग्नि अग्नीलाच जाळणार कसा? तप, सत्य, पातिव्रत्य यांच्या प्रभावानें सीता अग्नीलाच जाळून खाक करील. असा विचार करीत तो पुनः अशोकवनांत आला. त्यानें तिला अश्वासन दिलें आणि तिला प्रणाम करून उड्डाणाकरितां समुद्रकांठच्या पर्वताचा मार्ग धरिला.

तो पर्वत नीलरार्जीनें जणों वस्त्र पांघरून बसला आहे असा दिसे. त्याच्या शिखरावर लटकत असलेली मेघमाला दुपट्ट्याप्रमाणें दिसे. त्यावरील चकचकीत धातु नेत्रांप्रमाणें भासत. जलप्रवाहाच्या मंद मंद शब्दांनीं ग्रंथ-पठण-भास होई. झऱ्याचा मंजुळ ध्वनि गायनास मागें कादी. भयंकर सर्पांचे फूत्कार श्वासोच्छ्वासवत् वाटत. तो पर्वत विशाल व अत्युच्च शिखरांनीं शोभिवंत दिसे. त्यावर असंख्य वृक्षलता विराजमान झाल्या होत्या. धातूंच्या खाणींनें त्याला विचित्र प्रकारची शोभा आली होती. जिकडे तिकडे सिंह, व्याघ्र इत्यादि हिंसक पशु व मंजुळ स्वरानें गाणारे पक्षी इत्यादिकांच्या गजबजाटानें तो पर्वत सारखा भरून गेला होता.

त्या पर्वतावरून एकदम उड्डाण करून हनुमान तडाक्यासरसा अंगदादिकांच्या पुढें येऊन उभा राहिला. सर्व वानरांनीं त्याचा आदरानें गौरव केला. " सीता लंकेंत सुखरूप आहे " असें हनुमानानें प्रथमदर्शनींच सांगतांच सर्वांस आनंदीआनंद झाला. नंतर त्यानें प्रारंभापासून तेथें येईपर्यंतची सर्व हकीगत सांगितली. तेंव्हां आपणच लंकेंत जाऊन रावणाचा सं-

हार करावा व सीता आणावी, अशाविषयीं त्या वानर-प्रभृति मंडळींनें बरीच भवति न भवति करून श्रीरामानें आपणांस तसें करावयास सांगितलें नाहीं, अशा विचारानें ती वानर-सभा तेथून सुग्रीवाकडे गेली.

सुग्रीव श्रीरामाकडे गेला. तोंच हनुमानही सर्व मंडळीसह तेथें आला. त्यानें श्रीराम-लक्ष्मणास साष्टांग प्रणिपात केला. सीतेनें दिलेलें शिरोभूषणही दिलें व सविस्तर वृत्तांत कथन केला. तो ह्मणाला " मीच मातोश्री सीतेस घेऊन आलों असतों; पण माझ्यानें प्रभु-आज्ञेशिवाय तसें करवेना. लंका इंद्रनगरीपेक्षांही अतिशय समृद्धिमान आहे. नगरीला चार दिशा व चार महाद्वारें आहेत. सुवर्णाचे किल्ले आहेत. त्यां सभोंवार सखोल विशाल खंदक आहेत. त्यांवर सदृढ पूल आहेत. लंका पर्वतशिखरावर आहे. जिकडे तिकडे संरक्षणार्थ सशस्त्र राक्षससेना आहे. उत्तरेकडील द्वारभागांत चांगली व्यवस्था व प्रबलता आहे. मीं सर्व पूल मोडून टाकिले, खंदक बुजविले, लंकेस अग्नि लाविला आणि कित्येक किल्ले मातींत मिळविले. तेथें ससैन्य जाण्यास केवळ समुद्राचा व्यत्यय आहे; तरी आज्ञा होत असेल तर मी, द्विविद, अंगद, जांबवान, पनस, नल व नीलप्रभृति जाऊन सर्व लंका नगरी आणून आपल्या पुढें ठेवूं;आणि ससैन्य जाण्याचा हेतु असेल, तर मुहूर्त पाहून प्रस्थान ठेवा. "

श्रीराम ह्मणाला " माझ्याशिवाय तुह्मी लंकेचा सर्व नाश कराल, रावणाचा प्राण घ्याल व सीतेस आणाल हें सर्व सत्य आहे. परंतु, मीं सैन्यसह तेथें

जावें व **रावणाचा** वध करावा, असा माझा अभिप्राय आहे. **सुग्रीवा**, ह्या मध्यानकालच्या अभिजित मुहुर्तावरच प्रयाण करावें असें मला वाटतें. **नील** सेनापति, ज्या मार्गास फळ, मूळ, कंद, मधुर मधाची पोळी, सुंदर वनोपवनें व मधुर उदक असेल त्या मार्गानें आपण जाऊं. आपल्या सैन्यानें वाटेंत कोणालाही उपद्रव देऊं नये. वाटेंत राक्षसादिकांनीं जलप्रवाह, विषादि घातक पदार्थांनीं दूषित केले असतील, तर त्याचा चांगला शोध ठेवा. **गज**, **गवय** व **गवाक्ष** ह्यांनीं स्वसेनेसह अग्रभागीं जावें. **वृषभ** सव्यांगीं, **गंधमादन** वामभागीं आणि **जांबवान**, **सुषेण** व **वेगदर्शी** ह्यांनीं पृष्ठभागीं रहावें. मीं **हनुमानाच्या** व **लक्ष्मण अंगदाच्या** स्कंधावर बसून उभयतां सेनेच्या मध्यभागीं राहूं. आणि **सुग्रीव** आह्मांजवळ राहील."

अशी सर्व व्यवस्था ठरवून **श्रीरामानें** वानरसैन्यासह प्रयाणमुहूर्त केला. त्यासरशींच रणगंभीर घोरतर वाद्यें वाजूं लागलीं. त्यांच्या उत्साही ध्वनींत '**श्रीराम**' जयजयकाराचा विजयध्वनि मिसळून एकच गजर झाला व त्याचे त्या पर्वतांत अनेक प्रतिध्वनि होऊं लागले. वानरसेना लहानमोठ्या वृक्षांवरून आनंदानें धडाधड उड्या टाकीत निघाली. आस्वलांनीं मधाच्या पोळ्यांचा तडाका उडविला. जो तो **श्रीरामाचा** जयजयकार करीत निघाला. **नील** सेनापति तपासाकरितां पुढें जात होता. **शतबली** सेनेसभोंवार फिरून व्यवस्था ठेवी. लक्षावधि वानरसैन्य '**श्रीराम**' नामाचा आनंदानें कल्लोळ करीत जात होतें. जणु उत्तर महासागर दक्षि-

ण महासागरास भेटूं जात होता. असें ह्मटलें तरी चालेल. वानरसैन्य महेंद्राचलीं आलें. तेव्हां त्यास तेथून समुद्र दिसूं लागला. उत्तरेकडील मंद-सुगंध-शीतल वायु सुटला व सर्व समरोत्सुक वानरसेनेच्या हृदयांत हर्षाच्या उकळ्या फुटूं लागल्या.

लंकेंत हनुमानानें जें अपूर्व कर्म केलें, त्यामुळें रावणास मरणप्राय दुःख झालें. त्यानें आपल्या मुख्य मंत्र्यास बोलावून विचारिलें " प्रधान, विजयाचें मूळ विचार होय. विचारानें जो मनुष्य कार्यारंभ करून दैवाची सहायता मिळविण्याच्या प्रयत्नास लागतो, तो उत्तम पुरुष होय. जो विचार मंत्र्याच्या नीतिरूप चक्षूंनीं अवलोकन होऊन सर्वानुमतें निश्चित झाला, तो सर्वोत्तम विचार. एतदर्थ पुढें कर्म करावें: हें सांगा. यःकश्चित एका वानरानें जर लंकेचा इतका विध्वंस केला, तर श्रीरामाबरोबर किती वानर असतील कोण जाणे ! "

" आपलें सैन्य अति प्रबल आहे. तुह्मीं कुबेराचा, वरुणपुत्राचा व यमाचाही पराभव केला. स्वपराक्रमानें इंद्रजितानें इंद्रास जिंकिलें आणि बंदीवान करून लंकेंत आणिलें. आपण मर्कटांची किंवा मानवांची चिंता करणें अश्लाघ्य. " असें मंत्र्यानें सांगितलें. प्रहस्त सांगूं लागला " मी असावध नसतों, तर तेव्हांच त्या वानरास ठार केलें असतें. "

प्रहस्ताचें भाषण संपूर्ण झालें नाहीं, तोंच दुर्मुख, वज्रदंष्ट्र, निकुंभ, धूम्राक्ष वगैरे मंत्री मध्येंच उठले व रावणास अहितानुमोदन देऊं लागले. तें ऐकून बिभीषणाच्यानें शांत रहावेना. तो ह्मणाला " विद्वान लोकांचें

असें मत आहे कीं, ज्या गोष्टींचा सामदाम भेदानें शेवट होत नाहीं, त्याकरितांच पराक्रम करावा. शत्रूची शक्ति किती व आपली किती ह्याचा विचार प्रथम करावा. पूर्ण विचार केल्याविना शत्रूची सहसा अवज्ञा करूं नये. सत्याचा नेहमीं विजय होतो. **श्रीरामानें रावणाचें** मुळींच अनहित किंवा अपराध केला नाहीं. सूक्ष्म विचार केला, तर विपक्ष अन्यायी आहे असें मला वाटत नाहीं. **सीतेला श्रीरामाकडे** पाठवावी आणि कलहाचें मूळ काढून टाकावें. गेल्या गोष्टींचा विचार करीत बसण्यांत कांहींच अर्थ नाहीं. सौख्य व धर्मनाश करणारा कोप त्यागा आणि आनंद व कीर्तिकारक धर्म सेवा: तरच सुखानें वांचाल. "

**रावण** ह्मणाला " सर्व सभ्य जन हो, प्रीय—अप्रीय, सुख दुःख, लाभ अलाभ, हित अहित, धन व धर्म इत्यादि गोष्टींत तह्मी माझे साह्यकर्ते आहांत. तुमच्या अनुमतानें मीं जीं कृत्यें केलीं, तीं कधीं विफल झालीं नाहींत व सहा महिने झोंपी गेलेला **कुंभकर्णही** सभेंत आला आहे. ह्या कलहाचें आदि कारण सर्वांस माहीत आहे. **सीतेची** मीं अनेक तऱ्हेनें समजूत केली; पण ती माझें मागणें एकून घेत नाहीं. दूतमुखानें मला असें समजलें कीं, असंख्य सेना घेऊन **श्रीराम** आह्मांशीं संग्राम करण्याकरितां येत आहे. तो समुद्र उल्लंघन करून येणें अशक्यच. मला त्याचा विचार नाहीं. माझ्या भाषणांतील मुख्य सारांश इतकाच आहे कीं, सीता द्यावी लागूं नये व श्रीराम—लक्ष्मणाचा वध होऊन आपला कार्यभाग साधावा, असा स्वहितकर उ-

त्तम अभिप्राय तुह्मी सांगाल अशी मला आशा आहे. ''

**कुंभकर्ण** ह्मणाला '' विषयलंपट राजाचीं छिद्रें शत्रूच्या तेव्हांच लक्ष्यांत येतात. **सीता**-हरण केलें तेव्हांच जर आह्मांस विचारिलें असतें, तर आह्मीं तसें करूं दिलें नसतें. आपण भावी फलाचा विचार केल्याशिवाय प्रबल पुरुषाच्या स्त्रीचें हरण करून निंद्य व अन्यायकर्म केलें, असो, आतां त्या गोष्टीची चर्चा करणें निरर्थक. तुह्मीं जरी अनुचित कर्म केलें, तरी मी तुमच्या पक्षांत राहून शत्रुसंहार करीन. एक बाण सुटला कीं मी एकटा सर्व शत्रूंस खाऊन जाईन. ''

**बिभीषण** ह्मणाला '' माझ्या स्पष्ट भाषणाविषयीं तुह्मी क्षमा कराल अशी मला आशा आहे. तुह्मी सर्व राक्षस आपल्या कुलाचा केवळ संहार करण्याकरितां मित्ररूपी शत्रु अवतरलां आहांत; आणि ह्या अविचारी, व्यसनग्रस्त व प्रखरस्वभावी **रावणा**चा मिथ्या स्तुतिवाद आरंभिला आहे. पण, ह्या दुष्कर्मांचा परिणाम चांगला होणार नाहीं. त्रैलोक्यविजयी **रामाच्या** परम जाज्वल बाणानें तुमचा केव्हां संहार होईल हें तुह्मांस समजणार देखील नाहीं. मी राजाच्या, मंत्र्याच्या, प्रजेच्या व माझ्या परम धनाढ्य देशाच्या हिताकरितां पुनःही सांगतों कीं, **सीतेला श्रीरामाकडे** पाठविण्यांत सर्वांचें हित आहे. वानरगणांच्या सहायानें **श्रीरामाच्या** सामर्थ्याची वृद्धि झाली आहे.व **लंके**चा एका वानरानें जो विध्वंस केला, त्यामुळें राक्षसांचा उत्साह भंग झाला आहे. ही गोष्ट महान विचारणीय आहे. ''

त्यानंतर **इंद्रजितानें** आढ्यतेनें सांगितलें, ''आमचे

काका बिभीषण हे फार भ्याड आहेत. मी एकटा श्रीरामासह सर्व मर्कटांस निमिषांत यमालयीं पाठविण्यास समर्थ आहें. असल्या क्षुद्र गोष्टींचा विचार पाहिजे कशाला ? ”

पुनः बिभीषण ह्मणाला “ इंद्राजित अद्याप बालबुद्धि आहे. महा साहसी व दुर्बुद्धि इंद्रजिता, तूं पित्याचा पुत्ररूपी शत्रु होऊं नकोस. कोणत्याही कामीं दूरदृष्टि द्यावी हेच भूषण होय. ”

रावणानें उन्मत्तपणानें सांगितलें. “ दायादांचें भय फार खरें. जशी धेनूंत स्वच्छता, स्त्रियांत चपलता आणि मुनिजनांत तपता असते, तशीच दायादांपासून निश्चयानें भीति उत्पन्न होते; अथवा तें केवळ भीतीचें स्थान ह्मटलें तरी चालेल. बिभीषणाला माझें ऐश्वर्य किंवा कीर्ति सहन होत नाहीं, इतक्याकरितांच तो अशीं प्रलापवचनें सांगतो. हत्तीला स्नान घातलें तरी तो डोक्यांत धूळ घालण्यास जसा चुकत नाहीं, त्याप्रमाणें दायादांस कितीही द्या, त्यांचा संतोष होईल तें करा; पण ते आपल्या स्वभावाप्रमाणें केल्याशिवाय कधींही राहणार नाहींत. मी ह्याला आतांच कठीण शिक्षा केली असती; परंतु काळाचा विचार करून ह्याचा धिःकार करितों. ह्याला इतकेंच शासन तूर्त पुरे. ”

बिभीषणाला रावणाचें मानहानीचें भाषण अगदीं सहन होईना. तो त्वेषानें ह्मणाला “ तुझ्या बुद्धीचा भ्रंश झाला आहे. तूं मला पित्याप्रमाणें पूज्य आहेस; परंतु अधर्म-मार्ग-प्रवृत्त झालास. असो. तुझें असें कठोर वचन ऐकावयास मी येथें रहात नाहीं. ”

**बिभीषण** मंत्रापानें संभंतून उठला. तो आपले चार मंत्री बरोबर घेऊन **श्रीरामास** शरण आला. त्याला अभय न देण्याविषयीं **लक्ष्मणासमक्ष सुग्रीवानें श्रीरामास** पुष्कळ सयुक्तिक कारणें दाखविलीं. तेव्हां सर्वांचा अभिप्राय कसा पडतो, हें पहाण्याकरितां **श्रीरामानें हनुमानास** प्रश्न केला. त्यानें " लुच्चे लोक आंतरिक भाव गुप्त ठेवून संधि सांपडतांच मृड उगवितात. एतदर्थ त्याच्या गुणदोषांचा विचार करून जर तो सद्गुणी असल, तर त्यास आश्रय देण्यास चिंता नाहीं. " असा अभिप्राय दिला. **अंगद, शरभ, जांबवान व मंद** ह्या सर्वांचे अभिप्राय " साधक-बाधक विचार करून **श्रीरामानें** कायतें निश्चित करावें " असे पडले. त्यावर पुनः **हनुमान** ह्मणाला "काम सांपल्याशिवाय पुरुषांच्या गुणदोषांची परीक्षा होत नाहीं. आणि अपरिचितावर एखादें काम सोंपविणें ह्मणजे केवळ धाडस. **बिभीषणाच्या** मुद्रेवरून त्याला अभय दिलें, तर कांहीं अनहित होईल असें मला वाटत नाहीं. त्याचें अंतरंग शुद्ध वाटतें. जो पुरुष मनाचा मळीण, तो निःशंकमनानें कधींच येणार नाहीं. "

सर्वांचा अभिप्राय ऐकून **श्रीराम** शांतमनानें ह्मणाला "**बिभीषण** कोणत्याहि हेतूनें येवो. जर तो आह्मांस शरण आला आहे, तर त्यास अभय देणें हें आमचें मुख्य कर्तव्य होय. गुणवानाचें रक्षण करण्यापेक्षां दोषयुक्ताचें रक्षण करण्यांत विशेष उत्कर्ष आहे. दुष्ट जनाचा स्वीकार करणें जरी निंद्य आहे, तरी तो शरणागत येईल तर त्याचा स्वीकार करणें अनिंदित आहे. "

" **बिभीषणानें** संकटकाळीं स्वबंधूचा त्याग केला. तो आपल्या किती उपयोगी पडेल? हें दिसतच. **ह्या** विश्वासघातक कृतघ्नाचा स्वीकार करणें मला हित-प्रद वाटत नाहीं " असें **सुग्रीवानें** सांगितलें.

त्यानंतर बराच वादविवाद होऊन **श्रीरामानें बि-भीषणाची** सर्व स्थिति ऐकून त्यास अभय दिलें व **रावणाचा** वृत्तांत विचारिला. तेव्हां **बिभीषण ह्मणा-**ला "**ब्रह्मदेवाच्या** वरप्रदानामुळें **रावण** फारच उन्मत्त झाला आहे. त्याचा बंधु **कुंभकर्णही** प्रबळ पराक्रमी आहे. **रावणाच्या प्रहस्त** सेनापतीनें कैलासांतील **मणिभद्र** यक्षाचा पराभव केला. **इंद्रजित** आकाशांत अंतर्हित होऊन युद्ध करितो; ह्यामुळें त्याचा पराभव करणें सर्वांस फार कठीण पडतें. त्याचें अभेद्य कवच आहे. ह्याशिवाय अनेक प्रबळ पराक्रमी राक्षस **आहेत."**

**श्रीरामानें बिभीषणास लंकेचें** राज्य देतों असें वचन दिलें व **श्रीरामाच्या** आज्ञेप्रमाणें **लक्ष्मणानें** सागराचें जल आणून त्यास तेथेंच **लंकेच्या** राज्याचा अभिषेक केला.

लंकापतीनें **सुग्रीवास** आपल्या पक्षांत ओढण्याक-रितां, भेद करण्याकरितां किंवा परस्परांच्या **युद्धांत** अलिप्त रहा अशी सूचना देण्याकरितां **शुक** नामक चतुर राक्षसास पाठविलें. तो **सुग्रीवाशीं संभाषण करी-त आहे, असें वानरवर्गानें पहातांच त्यास धरून त्या-नें यथेच्छ मार दिला. परंतु, श्रीरामास जेव्हां हें वर्त-मान समजलें, तेव्हां त्यानें शुकास वानरांच्या तडाक्यां-**तून सोडविलें. तो पुनः **सुग्रीवाकडे आला. सुग्रीवाचें**

व त्याचें संभाषण सुरू होतें; इतक्यांत अंगदानें धरून त्यास प्रतिबंधांत ठेविलें.

**बिभीषणाच्या** अनुमतानें वानरसैन्य समुद्रतीरीं आलें. त्यांत **नळ** शिल्पकलाकुशल होता. त्यानें सागरावर सेतु बांधण्यास प्रारंभ केला. हजारों वानर मोठमोठे दगड घेऊन येऊं लागले. कित्येक वानर पूल बांधण्याच्या कामीं **नळाच्या** हाताखालीं सहाय करूं लागले. लौकर काम व्हावें व परिश्रम होऊं नये ह्मणून त्यांनीं आपल्या बुद्धिसामर्थ्याप्रमाणें कित्येक मंत्रांचें सहाय घेतलें. पहिल्या दिवशीं चौदा, दुसऱ्या दिवशीं वीस, अशा क्रमानें सर्व सेतु तयार झाला. तो दहा योजनें रुंद व शंभर योजनें लांब होता.

आनंदगजरांत वानरसैन्य **लंकेंत** पोंचलें. समरप्रवीण योद्ध्यांचा उत्साह पाहून **श्रीराम-लक्ष्मणासही** हर्ष झाला. त्यांची आज्ञा होतांच पुरुषाकार व्यूहरचना केली. आणि शुकासही **अंगदानें श्रीरामाच्या** आज्ञेनें सोडून दिलें.

**शुकानें रावणास** इत्थंभूत वृत्त सांगितलें "देव दानव युद्धास आले तरी आपण **सीता** सोडणार नाहीं" असा **रावणाचा** दृढ निश्चय होता. त्यानें **श्रीराम-सैन्याची** संख्या, सिद्धता, स्थिति, बल, शस्त्रास्त्रें व उत्साह इत्यादि पाहून येण्याकरितां **शुक** व **सारण** ह्यांस पाठविलें. **रावणास** प्रबलतर शक्तिगर्वानें सर्वांशीं ग्रासलें होतेंच. आपल्यासारखा शक्तिसंपन्न कोणीच नाहीं,असा त्याचा निर्धार होता.

**शुक** व **सारण** वानरवेषानें वानरसेनेंत हिंडत अ-

मनाना गुप्त हेर म्हणून वानरांनीं त्यास धरिलें व श्रीरामाकडे आणिलें. श्रीराम त्यांस उदार मनानें सांगू लागला " तुम्ही रावणाच्या आज्ञाप्रमाणें सर्व काम केलें असेल तर ठीकच. नसेल तर आमच्या सैन्याची किंवा योध्यांची जी स्थिति अवलोकन करावी अशी तुमची वासना असेल, ती करा. तुम्हाला संकोच वाटत असेल, तर बिभीषणास तुमचे बरोबर देतों. तो सर्व माहिती सांगेल. "

श्रीरामानें शुक व सारण यांस सेनेबाहेर काढून लावल्यावर ते रावणाकडे येऊन सांगू लागले " बिभीषण तर आम्हांस देहांत शिक्षा करीत होता. परंतु, धर्मात्मा श्रीराम फार दयाळु म्हणून हे पाय आमच्या दृष्टीस पडले. श्रीराम, लक्ष्मण, बिभीषण व सुग्रीव इतकेच वीरश्रेष्ठ लंकेचा सर्व नाश करतील. श्रीरामाच्या मुखश्रीकडे व आयुधांकडे पाहिलें, तर तो एकटाच सहज सर्वांचा संहार करील असें दिसतें. "

रावणानें श्रीरामाच्या सैन्याची रचना पाहिली आणि तो सीतेकडे येऊन सांगू लागला " तूं ज्याच्या भरंवशानें माझा नेहमीं अपमान करीत होतीस, तो श्रीराम युद्धांत पडला. आतां तूं माझी भार्या हो. लक्ष्मणास आम्हीं हांकून लाविलें. बिभीषणास लंकेंत आणिलें. सुग्रीव व हनुमान वगैरे सारे वीर ठार मारिले " इतक्यांत विद्युनजिव्ह तेथें आला. त्याला रावणानें पूर्वींच सूचना दिली होती कीं, " तूं श्रीरामाच्या शिरकमलाप्रमाणें कृत्रिमी शीर व धनुष्य घेऊन ये. " त्यानें शिरकमल व धनुष्य रावणापुढें ठेविलें. तेव्हां तें सीतेस

दाखवून तो ह्मणाला "हें पहा **श्रीरामाचें** शीर व धनुष्य."

**श्रीरामाचें** शिरकमल पहातांच **सीता**, हाय ! रे देवा! असें ह्मणत भूमीवर मूर्च्छित पडली. ती शुद्धीत आल्यावर तिनें **श्रीरामाच्या** कृत्रिम मुखाकडे पाहून पुष्कळ विलाप केला. इतक्यांत प्रहस्ताकडून **रावणास** निमंत्रण आलें ह्मणून तो तेथून गेला. त्याबरोबरच कृत्रिमी शीरही अदृश्य झालें.

**रावणाच्या** मोहमानें **सीता** फार विव्हळ झाली आहे व **रावणही** तेथून गेला, असें पाहून **सरमा** तेथें आली ( ही **सीतेस** आपली बहीण समजत असे. ) आणि सांगूं लागली " तूं उगीच संभ्रमांत पडलीस. **श्रीराम** वानरसेनेसह सुखरूप आहे. येथें शिरकमल आणलें तें शुद्ध मायेचें ! "

**रावण** सिंहासनावर विराजमान झाला, त्याला **प्रहस्तानें श्रीरामाच्या** सेनेची, युद्धसिद्धतेची व आपल्या सैन्याचीही सर्व तयारी सांगितली. तेव्हां **रावण** ह्मणाला " पूर्व द्वारावर **प्रहस्त**, दक्षिण द्वारावर **महापार्श्व** व **महोदर**, पश्चिम द्वारीं **इंद्रजित** आणि उत्तर द्वारावर मी रहातों. "

**रावणानें** युद्धाची सिद्धता केली, असें समजतांच **श्रीरामानें** सर्व व्यवस्था निश्चित केली ती अशी. " **नीलानें प्रहस्ताशीं. अंगदानें महोदर व महापार्श्व ह्यांशीं. हनुमानानें इंद्रजिताशीं आणि मी व लक्ष्मण रावणाशीं युद्ध करूं. सुग्रीव, जांबुवान व बिभीषण ह्यांनी मध्यभागाची व्यवस्था ठेवावी. आपल्या सेनेंतील कोणत्याही वानरानें मनुष्याचें किंवा दुसरें रूप धरूनये**

बिभीषण व त्याचे चार मंत्री ह्यांनीं मात्र मनुष्य-रूपानें रहावें. आह्मी दोघे नर आहोंत. ह्या सातांशिवाय जो कोणी मनुष्यदेहधारी दिसेल, त्याविषयीं फार सावध रहावें. तसेंच कोणताही वानर दुसऱ्या वानराशीं युद्ध करीत आहे असें दृष्टीस पडेल, तर राक्षस समजून त्यास ठार मारावें. बिभीषण व त्याचे मंत्री ह्यांनीं फार करून माझ्या जवळच रहावें. "

श्रीरामसेनेची व्यवस्था रावण किल्ल्यावरून पहात होता. तें सुग्रीवानें पाहिलें आणि पटकन उडी मारून रावणाच्या मस्तकावरील मुकुट भूमीवर पाडून तो सांगूं लागला " अरे दुष्टा रावणा! मी श्रीरामाचा मित्र व दास आहे. आतां येथेंच तुला ठार मारितों " तितक्यांत त्वरा करून रावणानें त्याला धरलें. परस्परांचें द्वंद्व युद्ध होऊं लागलें. बरीच झटापट झाल्यावर सुग्रीव स्वसैन्यांत आला. ह्या साहसाविषयीं सुग्रीवास श्रीरामानें दोष दिला. व पुनः असें करूं नको असेंही सांगितलें. नंतर अंगदास रावणाकडे शिष्टाई—मध्यस्थी करण्याकरितां पाठविलें. त्यास श्रीरामानें सांगितलें " रावण दंडासच पात्र आहे. पण, राजधर्माप्रमाणें प्रथम शिष्टाई करणें भाग आहे. तूं रावणास स्पष्ट सांग कीं, तूं आमच्या प्रतापापुढें तुच्छ आहेस. आह्मीं लंकेस घेरा दिला आहे. तूं आजपर्यंत अतिशय निंद्य पातककर्म केलेंस. माझ्या स्त्रीचें हरण केलेंस. त्या सर्वांचें फल भोगण्यास सिद्ध हो. शरण आलास तर तुला जीवदान देऊं; नाहींतर तुझ्या दुष्कर्माचा घट भरला असें समज. "

**अंगदानें रावणाच्या** देदिप्यमान सभागृहांत जाऊन शिष्टायीचा विचार प्रदर्शित केला. परंतु, ज्याचें दैव फिरलें अथवा जो मृत्युमुखांत पडणारा, त्याला दिव्य अमृत आणून दिलें ह्मणून होणार काय ? रागाच्या भरांत **रावणानें श्रीरामदूत अंगदास** धरा अशी चार राक्षसांस आज्ञा दिली. तरी, लंकेंत आपलें नांव प्रख्यात करून **अंगद** निसटून **श्रीरामाकडे** आला.

**श्रीरामानें अंगदाची** स्थिति एकतांच युद्धसिद्धता केली. त्यासरशींच वानरसेना सिंहनाद करूं लागली. दोन्ही पक्षांची तयारी होतांच युद्धसिद्धतेचा घोर रणदुंदुभि वाजतांच **रावणसेनेंत** शंख व भेरींचा एकच कल्लोळ होऊं लागला. वानरांची व राक्षसांची घनघोर गर्जना, रणवाद्यांचा गंभीर व उत्साहप्रपूरित ध्वनि, योध्यांच्या पद ताडणाचा दणका, रथांचा व हत्तीघोड्यांचा भयंकर कलकलाट एकतांच कानटाळच्या बसल्या. धरणी कंपायमान होऊं लागली. वानरांनीं वृक्ष, पाषाण, पर्वत इत्यादि राक्षसांवर फेंकण्याचें आरंभिलें. कित्येकांस ते नखांनीं व दांतांनीं फाडून तोडून ठार मारूं लागले. राक्षसांच्या अनिवार रक्तांचे रणभूमीवर पाट चालूं लागले. त्यांत मांसाचा चिखल झाला. रात्रींचें युद्ध बंद होतें.

**हनुमानानें जंबुमाली, नळानें प्रतपन, सुग्रीवानें प्रघंस, लक्ष्मणानें विरूपाक्ष, मैंदानें वज्रमुष्टी, निळानें निकुंभ, सुषेणानें विद्युन्माली,** आणि श्रीरामानेंही कितीएक राक्षस ठार मारिले. **अंगदानें** इंद्रजिताचा पराभव केला. रात्रीं युद्ध करावें असा राक्ष-

मांचा हेतु होता. जिकडे तिकडे धरा, मारा, हाणा, ठोका, चोपा. असे शौर्योत्पादक शब्द चालू होते. दोन्ही पक्ष मारूं किंवा मरूं अशा उत्साहानें तुमुळ युद्ध करूं लागले. ब्रह्मदेवाच्या वरदानानें उन्मत्त झालेला इंद्रजित अंतर्हित होऊन श्रीराम-लक्ष्मणास दारुण शरवर्षावानें जर्जर करूं लागला. त्यानें दोघांसही नागपाशबद्ध केलें. श्रीराम धनुष्यासह असावध पडला. लक्ष्मणाचीही तीच दशा झाली. हनुमानादि वानर दारुण शोक करूं लागले. श्रीरामसेनेंत हाहाःकार झाला!

इंद्रजिनानें स्वपराक्रम पित्यास सांगतांच त्याचा आनंद गगनीं मावेना. त्यानें पुष्पक विमानांत बसवून सीतेस श्रीराम व लक्ष्मण मृत झालेले दाखविले. तेव्हां ती फारच विलाप करूं लागली. तिचें त्रिजटेनें शांतवन केलें आणि तें विमान पुनः लंकेंत गेलें.

श्रीराम सावध झाला आणि लक्ष्मणाकरितां शोक करीत ह्मणूं लागला " आतां माझें जीवन व्यर्थ. मला सीतेसारखी स्त्री मिळेल, पण लक्ष्मणासारखा बंधु मिळणार नाहीं. काय त्याची बंधुप्रीति! काय शौर्य! औदार्य! गांभीर्य! हायहाय! काय संकटप्रसंग! माझ्या जीवितास धिःकार असो. लक्ष्मणा, तूं जसा माझ्याबरोबर वनवासांत आलास, तसाच मीही तुजबरोबर परलोकीं येतों. तुह्मी सर्व सैनिक वीर किष्किंधेस चला. मी आत्मघात करितों. मित्रधर्माप्रमाणें तुह्मी जें करावयाचें तें केलें. बिभीषणास मीं जें वचन दिलें, त्याचा भंग झाला तरी तें पाप मी परलोकीं भोगीन."

सुषेण ह्मणाला "पूर्वी देव-दैत्यांचें जें युद्ध झालें,

त मीं पाहिलें आहे. त्यांत असे असावधतेचे पुष्कळ प्रकार झाले होते. कित्येक देव दैत्यांच्या शस्त्राघातानें फार वेळ मूर्छित पडत. परंतु, त्यांस **बृहस्पति** गुरु- विद्येच्या प्रभावानें व औषधचिकित्सेनें तव्हांच सावध करीत. **संजीवकरणी** व **विशल्या** ह्या नांवाच्या दोन दिव्य औषधी क्षीरसमुद्रांतील **चंद्र** व **द्रोण** ह्या पर्वता- वर आहेत. त्या **संपाति** व **पनसद्र** ह्या वानरांच्या परिचयांतील आहेत. त्या फार सत्वर आणण्याकरितां **हनुमानास** पाठवा. औषधी येतांच मी **लक्ष्मणास** ताब- डतोब सावध करितों. ”

**सुषेण** बोलत आहे. तोंच समुद्र फार खवळला. प- र्वत थरथरूं लागले. वृक्ष उन्मळून पडूं लागले आणि सर्प व इतर जीवजंतु भयानें लपत छपत समुद्रांत जाऊं लागले. इतक्या संधीस तेथें अकस्मात **गरुड** आला. त्याबरोबर **श्रीराम-लक्ष्मणाचे** नागपाश पटापट तुटले. ते दोघेही चांगले सावध झाले. शरांनीं त्यांचा देह क्ष- तांकित झाला होता तोही सुवर्णसंपन्न झाला. त्यांचें बल, पराक्रम,तेज, कांती, उत्साह, स्मरणशक्ति व गांभीर्य दुप्पट वाढलें. **गरुडानें** दोघांसही आलिंगन दिलें. तव्हां **श्रीराम** ह्मणाला “ तुझ्या दर्शनानें आह्मांस अत्यंत समाधान झालें. तुझ्या कृपेनें आमच्या दुःखाचा विलय झाला. पण तूं कोण? हें सांग. ”

**गरुडानें** सांगितलें “ मी तुमचा मित्र आहें. तुमची सहायता करावयास येथें आलों. राक्षस कपटी आहेत. त्यांवर तुह्मी अगदींच विश्वास ठेवूं नका. मला **गरुड**

ह्मणतात" असें ह्मणत त्यानें **श्रीराम-लक्ष्मणास** प्रद-क्षिणा करून गमन केलें.

**श्रीराम** व **लक्ष्मण** सावध झाले. ते तेजःपुंज दि-सूं लागले. असें पाहून वानरसेना जयजयकार करीत **लंके**च्या द्वारांत येऊन थडकली.

"इंद्रजिताच्या नागपाशानें **श्रीराम लक्ष्मण** मूर्च्छित पडले. आतां आपण कृतार्थ झालों." अशा विचारानें **रावण** आनंदसागरांत गटंगळ्या खात आहे; तोंच वानरसेनेचा जयजयकारध्वनि त्याच्या कानीं पडून तो पुनः चकित झाला. **रावणा**ची सेना युद्धास येईपर्यंत वानरसेनेनें लंकेस वेढा घातला. तेव्हां पश्चिमद्वारानें एक लक्ष सैन्य घेऊन **धूम्राक्ष** बाहेर पडला; तोंच **हनुमा-नानें** त्यावर एक प्रचंड शिळा फेंकिली. त्याबरोबर त्याचा सैन्यासह चुराडा झाला. नंतर **वज्रदंष्ट्र** प्रबळ सैन्यासह पुढें आला. त्याशीं **अंगदा**नें युद्ध केलें. त्या-च्या द्वंद्व युद्धांत **वज्रदंष्ट्रा**चें धड **अंगदा**नें शिरापासून वेगळें केलें. **वज्रदंष्ट्रा**ची दुःखवार्ता ऐकून **रावणानें** **अकंपनास** पाठविलें. **अकंपना**च्या बाहुबलसामर्थ्यानें व युद्धनैपुण्यामुळें पुष्कळ वानरांचा संहार झाला. त्यानें चौ-दा बाण मारून **हनुमानाचें हृदय** विदारण केलें. **हनुमान** रक्तबंबाळ झाला, तरी अतिशय क्रोधानें युद्ध करीत होता-च. त्यानें एक अजस्र वृक्ष उपटून त्याच्या तडाक्यानें **अकंपनास** गतप्राण केलें. त्यानंतर मुख्य सेनापति **प्र-हस्त** मोठ्या धैर्यानें व शौर्यानें समर करूं लागला.

**प्रहस्त** वाजतगाजत मोठ्या आडंबरानें पुढें आला. परंतु, **द्विविद**, **दुर्मुख**, **जांबवान** व **तार** ह्या चार

**ण** एकदम मूर्च्छित पडला. त्यास समुद्रांत झुगारावें, अशा उद्देशानें **रावण** रथावरून खालीं उतरला; आणि त्यास उचलूं लागला. परंतु, तो कांहीं केल्या हालेना. तितक्यांत मोठ्या चपलतेनें **हनुमान रावणा**कडे आला; आणि त्यानें त्यावर दारुण मुष्टिप्रहार केला. त्याबरोबर **रावणा**च्या दाही मुखांतून रक्ताचे पाट वाहूं लागले. तो मूर्च्छागत पडतांच **हनुमानानें ल**क्ष्मणास उचलून **श्रीरामा**कडे नेलें.

**श्रीराम रावणा**बरोबर युद्ध करण्यास येत होताच. **रावण** शुद्धींत आल्यावर त्यांच्या अतिशय भयंकर युद्धास प्रारंभ झाला. क्रोधप्रदिप्त **रावणानें श्रीरामास** पहातांच, फार संतापानें **हनुमानास** प्रथम तीक्ष्णबाणांनीं आच्छादिलें. तो जखमी होतांच, **श्रीरामानें** एका प्रखरतर शरानें **रावणा**चा रथ, सारथी, घोडे व ध्वज ह्यांचा विध्वंस केला; आणि दुसऱ्या बाणानें हृदयाचा भेद केला. **रावणा**ची शुद्धि गेली. मुकुट गेला. यामुळें फार अपमानानें तो रणांगण सोडून गेला. नंतर **कुंभकर्ण** नामक **रावणा**चा बंधु युद्धार्थ सज्ज झाला. त्यानें देवदानवांचा व इतर सर्व प्रबल लोकांचा स्वसामर्थ्यानें पराभव केला होता. **रावणानें** त्याचा फार गौरव करून त्याला समरभूमीवर पाठविलें. त्याचा **श्रीराम-लक्ष्मणास** मारावें, इतकाच हेतु होता. **कुंभकर्ण** समरक्षेत्रांत येतांच, वानर त्यावर मोठमोठ्या शिळा घालूं लागले. पण, त्याच्या वज्रदेहास कांहींच इजा झाली नाहीं. तो एकसारखा वानरसेनेचा धुव्वा उडवूं लागला. कित्येक वानर पळाले, कित्येक परलोकीं गेले

आणि कित्येक घायाळ पडले. आपल्या सैन्याचा मोड होतो, असें दृष्टीस पडतांच अंगद स्वसेनेस धीर देऊं लागला. परंतु, त्याचा कांहींच उपयोग होईना. कुंभकर्ण शेंकडों वानरवीरांस ठार करूं लागला. तेव्हां मोठ्या धैर्यानें हनुमान त्याशीं लढूं लागला त्यानें कुंभकर्णाच्या कपाळावर एक पर्वत आणून टाकिला. त्यामुळें तो कांपूं लागला. क्रोधभरित कुंभकर्णानें त्रिशूळ मारून हनुमानास मागें हटविलें. तेव्हां नल, गवाक्ष, गंधमादन, शरभ व ऋषभ असे वानरपंचक एका जुटीनें कुंभकर्णावर हल्ला करूं लागले. पण, त्या सर्वांचा त्यानें पराभव केला; आणि सुग्रीवास काखेंत घेऊन तो रावणाकडे निघाला. सुग्रीव सावध होतांच त्यास आपली दशा समजली. त्यानें नखांनीं व दांतांनीं कुंभकर्णास फाडलें, व कान आणि नाक चावून टाकलें. त्याला खालीं टाकण्याचा कुंभकर्ण प्रयत्न करूं लागला; पण तो निसटून चेंडूप्रमाणें आकाशांत उसळला. कुंभकर्ण भांबावला. त्याला आपल्या देहाचीच शुद्ध नव्हती.

लक्ष्मण कुंभकर्णाशीं युद्ध करूं आला. पण, त्याचा तिरस्कार करून कुंभकर्ण श्रीरामाशीं युद्ध करूं लागला. प्रथमतःच श्रीरामानें रौद्रास्त्राचा प्रयोग केला; त्यामुळें कुंभकर्णाच्या तोंडांतून ज्वाला निघूं लागल्या, छाती दडपली, आणि हातांतील आयुधें गळालीं. तरी तो मरेना, तेव्हां वायव्यास्त्राचा प्रयोग केला; त्यामुळें मुद्गरसहीत त्याचा एक हस्त तुटला. पण तो, पडला तेव्हां कित्येक मर्कट व राक्षस त्याखालीं चेंगरून मेले. दुसऱ्या हातांत एक महान वृक्ष उपटून घेऊन कुंभकर्ण

**श्रीरामावर** धांवला. तेव्हां इंद्रास्त्रप्रयोगानें **श्रीरामानें** त्याचा दुसरा हातही तोडिला. नंतर **श्रीरामानें** दोन अर्धचंद्राकार बाण मारून त्याचे दोन्हीपाय व इंद्रास्त्रानें शिरकमल छेदन केलें. तें शीर लंकेच्या किल्ल्यावर पडलें. त्यामुळें किल्ल्याच्या तटाचा व द्वारांचा चुराडा झाला. आणि धड समुद्रांत पडलें. त्यानें कित्येक लष्कर प्राणास मुकलीं.

**कुंभकर्णा**सारखा अतुल विक्रम व शक्तिसंपन्न वीर-बंधु पडला. असें समजतांच **रावणास** मूर्छा आली. तो एकदम भूवर पडला. तेव्हां **देवांतक**, **नरांतक**, **त्रिशिरा** व **अतिकाय** हे रावणपुत्र शोकसागरांत पडले. शुद्धींत आल्यावर **रावणानें** आपला सर्वाधार **कुंभकर्ण** गेला, असें समजून फार फार शोक केला. पुत्रांना त्यानें समाधान केलें व त्यास नवीन उत्साह येईल, अशीं भाषणें केलीं. आणि ते **श्रीरामाबरोबर** युद्ध करूं निघाले. त्यांबरोबर **महोदर** व **महापार्श्व** नामक दोन मंत्र्यांसही **रावणानें** पाठविलें.

**अंगदानें** **नरांतकास** पहिल्याच तडाक्यास ठार केलें. तेव्हां **देवांतक**, **त्रिशिरा** व **महोदर** **अंगदावर** धांवले. **अंगदाच्या** सहायास **हनुमान** व **नील** होतेच. **हनुमानानें** वज्रमुष्टी मारून **देवांतकास** गतप्राण केलें. **नीलानें** **महोदरास** मारिलें व **ऋषभ** वानरानें **महापार्श्व** राक्षसाचा प्राण घेतला.

**लक्ष्मण** व **अतिकाय** ह्यांच्या युद्धांत दोघेही मूर्छित पडले. परंतु, सावध होतांच **लक्ष्मणानें** ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून **अतिकायाचा** देह व प्राण वेगळा केला.

जांबवान, नळ, नीळ अंगद व मैंद ह्यांस हताश करून इंद्रजित श्रीराम-लक्ष्मणासन्मुख आला. त्यासही ब्रह्मास्त्रप्रयोग करून निचेष्टित पाडिलें. तेव्हां हनुमान हिमालय पर्वतावर गेला व त्यानें मृतसंजीवनी, ( मृतास जीवंत करणारी ) विशल्य करणी, ( शरीरांतील शल्य काढणारी ) सवर्ण करणी, ( पूर्ववत अंगवर्ण करणारी ) व संधानी ( कापलेलें अंग सांधणारी ) अशा चार वनस्पति आणून सर्वांस पूर्ववत केलें. व त्याच दिवशीं रात्रीं वानरसेनेनें लंकेस अग्नि लाविला.

रावणाचा क्रोध अनिवार होऊन त्यानें कुंभ व निकुंभ ( कुंभकर्णपुत्र ) ह्यांस युद्धार्थ पाठविलें. अंगद, मैंद व द्विविद ह्या तिघांनीं यूपाक्ष, शोणिताक्ष, प्रजंघ व प्रकंपन ह्या चार महान राक्षसांस ठार मारिलें. व सुग्रीवानें कुंभाचा, हनुमानानें निकुंभाचा, आणि श्रीरामानें मकराक्षा ( खरपुत्रा ) चा संहार केला.

आतां अशा भानगडींत पडून कांहीं अर्थ नाहीं. आपण ब्रह्मास्त्रप्राप्त्यर्थ आराधना करण्याकरितां निकुंभिला देवीच्या मंदिरांत जावें, असा निश्चय करून इंद्रजित पश्चिमद्वारानें बाहेर पडला. वानराच्या अपार सेनेमुळें व श्रीरामानें ठेवलेल्या चांगल्या व्यवस्थेमुळें सगळीं आपल्या कार्यास व्यत्यय येईल, एतदर्थ त्यानें मायावी सीता करून तिचा वानरसेनेसमक्ष वध केला! असें पहातांच हनुमानाचा धीर खचला. आपले सर्व परिश्रम विफल झाले, असें त्याला वाटलें; आणि तो मागें वळला. तितक्यांत त्यास जांबवान भेटला. त्याला त्यानें सीतावृत्त कथन केलें. तेव्हां तोही विरू-

त्साह होऊन **श्रीरामा**कडे निघाला. ही फुकटची संधि साधून **इंद्रजित** निकुंभिलेस पोंचला. त्यानें होमहवनाची सर्व सिद्धता केली.

**हनुमानानें श्रीरामास सीतावधाचें** वर्तमान सांगतांच त्याच्या शोकाची सीमा झाली. त्याला दाही दिशा उदास दिसूं लागल्या व आतां **प्राण** जाईल तर चांगलें असें वाटूं लागलें. तेव्हां **लक्ष्मण**ही दीनवदन झाला. त्याला काय करावें हेंच सुचेना. तो संतापानें म्हणाला "धर्म व्यर्थ आहे. धर्मानें सौख्य होतें. असें म्हणतात तेंही मिथ्या. अधर्माचें फळ सुख व धर्माचें फळ दुःख हेंच खरें. धर्म केवळ अशक्त व नपुंसक आहे. धर्माचें मूळ धन व धनाचें मूळ राज्य होय. **श्रीरामानें** राज्य त्याग करितांच धर्ममुळीं कुठार घातली. उन्हाळ्यांत लहानसहान नद्या जशा कोरड्या पडतात, त्याप्रमाणें केवळ धर्मनिष्ठ राहून निर्धन झालेल्या सर्व पुरुषांची सर्व क्रिया व्यर्थ होते. सर्व लोक केवळ धनाचेच मित्र आहेत. ज्याकडे धन असेल, तो पंडित, पराक्रमी, बुद्धिमान व शूर-वीर होय. ज्यापाशीं धन नाहीं, त्याचा कोणताच पुरुषार्थ सिद्ध होत नाहीं. असो. जें व्हायचें तें झालें. आतां गत गोष्टीचा शोक करणें निरर्थक."

ह्याप्रमाणें **लक्ष्मण श्रीरामास** सांगत होता. **श्रीराम** त्याच्या अंकावर पडला होता. वारंवार तो विलाप व परिताप करी; आणि केव्हां केव्हां दैवास किंवा कर्मास दोष लावी. **हनुमान** व **सुग्रीव** स्फुंदत रडत होते इतक्यांत मंत्रीजनासह **बिभीषण** तेथें आला. त्याला **सीतावधवृत्त** समजतांच तो सांगूं लागला "**रावण**

कधींही सीतावध करणार नाहीं किंवा करूं देणार नाहीं. इंद्रजिताचें हें शुद्ध मायामय कृत्य होय. वानरांस भुरळ पाडली आणि तो निकुंभिलेस निघून गेला. तो होमहवनादि सर्व क्रिया संपूर्ण करून ब्रह्मास्त्र संपादन करील. तर सर्वांचा संहार करण्यास एक क्षणदेखील नको. त्याची क्रिया संपूर्ण होण्यापूर्वींच आपण तेथें जाऊं तर फार चांगलें. श्रीरामा! तुम्ही व्यर्थ परिताप व शोक करूं नका. लक्ष्मणासह आम्हांबरोबर पाठवा. इंद्रजिताची होमक्रिया संपूर्ण होण्यापूर्वींच आम्ही त्यास ठार मारूं. तो मेला की रावण मेलाच असें समजा!"

श्रीरामानें सर्व यूथपतींस विभीषणाबरोबर जाण्याची आज्ञा दिली. ते महाकालीच्या मंदिरांत आले. त्यांनीं द्वाररक्षक राक्षसांस एकदम ठार मारिलें; आणि अवघा धांगडधिंगा माजविला. त्यामुळें इंद्रजित होमक्रिया अर्धीच टाकून युद्धास आला. तो रागानें विभीषणास फार दुर्वचनें बोलला. आणि "यमदूताप्रमाणें एक प्रखर बाण सोडून सर्वांस यमालयीं पोचवितो" असें सांगून प्रखरतर शरवृष्टीस त्यानें आरंभ केला.

त्याच्या कालस्वरूप बाणानें लक्ष्मण विद्ध झाला. व इंद्रजिताचीही तीच अवस्था झाली. इंद्रजितानें सात बाण लक्ष्मणास, दहा बाण हनुमानास, आणि शंभर बाण विभीषणास मारिले. लक्ष्मणानेंही अनिवार शरवर्षाव करून इंद्रजिताचें कवच तोडिलें. दोन्ही वीरपुंगवांचें अतुल पराक्रमी युद्धनैपुण्य पाहून देवादिक विस्मित झाले. ते भात्यांतून केव्हां शर काढीत, केव्हां

मनुष्यावर जोडीत आणि केव्हां सोडीत हेंही कोणाच्या समजूतींत येत नसे. एकदां इंद्रजिताचा जय होतो असें वाटे, व एकदां लक्ष्मण विजयी होईल असें मनांत येई. बाणांनीं आकाश घेरिलें. सूर्य अदृश्य झाला. मांसाहारी पक्षी दारुण ध्वनि करूं लागले. वायूची गति बंद झाली; आणि महात्मे "ह्या तडाक्यांतून जगाचें रक्षण होईल तो सुदीन." असें ह्मणूं लागले.

लक्ष्मणानें इंद्रजिताचा सारथी मारिला. तेव्हां तो स्वतःच सारथ्य व युद्ध करूं लागला. तरी लक्ष्मणाच्या शरवृष्टीपुढें त्याचा निभाव लागेना. तो निस्तेज झाला व त्याचा युद्धोत्साहही गेला. तितक्यांतच प्रमाथी वगैरे चार वानर त्याच्या घोड्यावर पडले. घोडे मरतांच तो भूमीवरूनच युद्ध करूं लागला. अंधःकारानें दाही दिशा व्यापल्या. आपला कोण व शत्रु कोण हेंही ओळखतां येईना! ती संधि साधून इंद्रजितानें नवीन रथ आणिला. त्याचाही चुगडा झाला. तो भूमीवरून युद्ध करूं लागला. त्यानें बिभीषणावर दारुण सांग फेंकिली. तिचे मार्गांतच लक्ष्मणानें तुकडे केले. पुनः त्यानें यमबाण सोडिला. तोही लक्ष्मणानें कुबेरशर सोडून निवारिला. लक्ष्मणानें वरुणास्त्र सोडतांच, इंद्रजितानें रुद्रास्त्र सोडिलें. इंद्रजिताचें अग्न्यस्त्र लक्ष्मणानें सूर्यास्त्रानें मोडिलें. शेवटीं लक्ष्मणानें इंद्रास्त्राचा प्रयोग करून " श्रीराम धर्मात्मा, सत्यप्रतिज्ञ व जगांत सर्वोत्तम वीर असेल, तर ह्या अस्त्रानें इंद्रजिताचा निःशंक वध होईल " असें ह्मणून सोडिलें. त्याबरोबरच इंद्रजित परलोकगत झाला.

**इंद्रजित** पडतांच वानरसेनेंत हर्षाचा व राक्षस सेनें-त शोकाचा कल्लोळ होऊं लागला. ऋषि व देवादिक **लक्ष्मणाची** अतिशय प्रशंसा करूं लागले. देवतांनीं आनंददुंदुभीचा गजर केला. आकाशांतून देवकुसुमांची वृष्टि होऊं लागली. **श्रीराम-लक्ष्मणाचा,** उभारी वानरसेना जयजयकार करूं लागली. ती विजयरं-गांत दंग होऊन वधें वाजवीत **श्रीरामाकडे** आली; आणि **बिभीषणानें** इंद्रजिताचें शिरकमळ **श्रीरामा-**च्या करकमळीं दिलें.

श्रीरामासही आनंद झाला. तो प्रेमानें सन्मानपूर्वक **लक्ष्मणास** आलिंगन देऊं लागला. त्यानें सर्व वानरसेने-चा आभार मानून स्तुति केली. आणि वैद्यविद्याप्रवीण **सुषेणास** व वानरसेनेंतील सर्व वीरांच्या चिकित्सा करा, असें सांगितलें. तेव्हां **सुषेणानें लक्ष्मणाच्या** नाकांत उत्तम औषधीचा रस घातला व इतर योद्ध्याचीही यथोचित चिकित्सा केली; ह्यामुळें सर्व सेना किष्किंधे-हून येतांना जशी तेजस्वी, सुवर्ण व उत्साहसंपन्न होती, तशी आली.

इंद्रास जिंकणारा **इंद्रजित** युद्धक्षेत्रांत स्वदेहार्पण करिता झाला. हें वर्तमान **रावणास** समजतांच त्याचें धैर्य गळालें. युद्धांत पतन पावलेल्या वीरांस सद्गती मिळते, ह्यामुळें **रावणाच्या** मनाचें कांहीं शांतवन झालें इतकेंच. नाहींतर तोही अपार शोकसमुद्रांत पडला असता. शोकापेक्षां त्याचा क्रोधच फार अनिवार झाला. तो काळस्वरूप करकर दांत चावूं लागला. **त्याच्या नेत्रांतून अग्नीच्या ठिणग्या पडतात, असें दिसूं**

लागलें. कोणालाही त्याकडे पाहण्याचें धैर्य होईना. राक्षसयोध्यांस उत्साह यावा. ह्मणून तो सांगूं लागला, " मीं फार दिवस तपश्चर्या केली. ब्रह्मदेवास प्रसन्न करून दिव्य कवच, रथ व धनुष्यबाण मिळविला. मला जिंकावयास कोणीही समर्थ नाहीं. इंद्रजितानें कृत्रिमी सीतेचा वध केला. पण. मीं तिचा आज खराच वध करितों. तिच्या आगमनापासून माझ्या सर्व घातास प्रारंभ झाला. आतांच आपण युद्धास जाऊं. तुह्मी सर्व राक्षस सिद्ध व्हा." असें सांगून तो सीतेचा वध करण्यास अशोकवनीं आला. तेथें अविंध्य नामक एक मंत्री त्यास सांगूं लागला. " तूं पुलस्त्यपुत्र व कुबेर-बंधु आहेस. आपण धर्मत्याग करून स्त्रीवधास प्रवृत्त होणें अयोग्य. ब्रह्मचर्य धारण करून विद्याभ्यास केला. तशांत अग्निहोत्री श्रीरामाचा वध केला कीं. सीता आपली आहे. आतां क्रोधाचा परिणाम रामावर करा. त्यांतच आपल्यास भूषण व कीर्ति मिळेल. "

अविंध्याच्या वाक्यानें रावणाचा संकल्प बदलला. तो ससैन्य श्रीरामाशीं युद्ध करण्याकरितां समरंगणीं आला. वानरांत व राक्षसांत पुनः दारुण संग्राम सुरू झाला. एकेक राक्षस शेंकडों वानरांवर तुटून पडूं लागले. वानरही राक्षसांचा विध्वंस करूं लागले. श्रीराम अदृश्य राहून गांधर्वास्त्रानें राक्षसांस ठार मारूं लागला. तेव्हां त्यांनीं प्राणरक्षणार्थ पलायन केलें.

आपण पुढें झाल्याशिवाय श्रीरामाचा वध होत नाहीं, असें पाहून रावण श्रीरामाशीं युद्ध करूं लागला. त्याच्या काळशरांनीं श्रीरामसेनेचा पाठारा उडू

लागला. वानरांची पळापळ सुरू झाली. तितक्यांत त्वरा करून सुग्रीव पुढें होऊन रावणावर पर्वतवृष्टि करूं लागला. लक्ष्मणानें त्याचा सारथी व रथाचे घोडे गतप्राण केले. रावणानें बिभीषणाचा प्राण घेण्याकरितां त्यावर महान सांग फेंकिली. पण. लक्ष्मणानें तीन बाणांनीं तिचे मध्येंच तीन तुकडे केले. पुनः रावणानें दुसरी सांग घेतली; आणि आतां तो ती बिभीषणावर सोडणार, इतक्यांत लक्ष्मण पुढें आला. रावण त्याशींच लढूं लागला. त्यानें बिभीषणावर सोडण्याकरितां सिद्ध केलेली सांग लक्ष्मणाच्या हृदयावर मारतांना " ही सांग तुझा प्राण घेवो " असें म्हटलें. तोंच श्रीराम " असें न होवो " म्हणाला. काळसर्पाप्रमाणें परम-भयानक सांग लक्ष्मणाच्या छातीवर बसतांच तो निचेष्टित पडला. श्रीराम त्याला सावध करून आतां रावण किंवा आपण ह्या जगांत रहात नाहीं, अशा अभिमानानें युद्ध करूं लागला. तेव्हां सर्व दुःखाच्या कारणांची त्याला स्मृति आली. तो म्हणाला " आज रावणाचा वध करून मी सर्व दुःखभागाचा त्याग करितों. माझा प्रबलतर शत्रु आतां मी माझ्या हातून जिवंत जाऊं देणार नाहीं. तुम्ही स्वस्थ रहा आणि निव्हाईताप्रमाणें राम--रावणाचें युद्ध पहा. त्रैलोक्यानें स्तुति गावी, असें मी आज अद्भुत कृत्य करितों." असें म्हणत म्हणत वीरश्रीनें तो रावणावर प्रखरतर शरप्रहार करूं लागला. तेव्हां त्याचा वेग रावणास सहन होईना; म्हणून तो अन्य स्थळीं गेला.

**श्रीराम सुषेणास सांगूं लागला " वैद्यराज ! लक्ष्मण**

मूर्च्छित आहे, तोंपर्यंत माझ्या हातून व्हावें तसें समर होत नाहीं. माझा हात शिथिल पडतो. अस्त्रविद्या स्फुरित होत नाहीं व नेत्र अश्रूंनीं भरतात."

**सुषेणानें श्रीरामाची** मनीषा जाणून लक्ष्मणाच्या नाकांत एक औषध घातलें. त्याबरोबर तो सावध झाला व **श्रीरामास** हर्षानें आलिंगन देऊं लागला.

**रावण** दुसरा रथ सज्ज करून श्रीरामावर बाण फेंकूं लागला. श्रीरामही तयारीतच होता. **रावण** रथारूढ आहे; आणि श्रीरामास रथ नाहीं, असें देवांनीं पाहिलें व ते म्हणूं लागले कीं, " हें समान युद्ध नव्हे." देवांचें भाषण ऐकतांच इंद्रानें **मातलीस** सांगितलें. " आपला रथ सिद्ध कर आणि तो श्रीरामाच्या सहायास ने." **मातली** श्रीरामाकडे आला व त्यास सांगूं लागला " इंद्रानें सर्व आयुधांसह हा रथ देऊन मला आपल्या सेवेस पाठविलें आहे. आज्ञा असेल, तर मी आपलें सारथ्य उत्तम रीतीनें करीन." त्या दिव्य रथास प्रदक्षिणा व प्रणाम करून **श्रीराम** रथांत बसला व **रावणाशीं** युद्ध करूं लागला. दोघांचेही रथ परस्परांस भिडले. तेव्हां गंधर्व व अप्सरा त्यांचें युद्धनैपुण्य पाहून असें म्हणूं लागल्या कीं, " हे उच्छृंखल आलेले दोन महासागर परस्परांशीं भांडत नसतील ना? यांशिवाय ह्यांस दुसरी कोणतीच उपमा लागू होणार नाहीं. ह्या **श्रीराम रावणांचें युद्ध श्रीराम-रावणा**सारखेंच होय."

**श्रीरामानें** एक दिव्य बाण सोडून **रावणाचें** मस्तक छेदिलें. परंतु, पुनः तें पूर्ववत् उत्पन्न झालें. असा **बराच वेळ क्रम चालला होता. रावणाचीं शंभर शिर-**

कमलें श्रीरामानें तोडिलीं. तरी त्यापासून कांहीं उपयोग झाला नाहीं. असें सात दिवस वनघोर युद्ध चाललें होतें. परंतु. रावणाचा अंत होईना. श्रीराम फार चिंताग्रस्त झाला. असें पाहून मातली ह्मणाला "ब्रह्मास्त्राचा प्रयोग केल्याशिवाय रावण कधींही मरणार नाहीं."

मातलीचें हितवचन ऐकून श्रीरामास फार हर्ष झाला. त्यास अगस्ति मुनीनें ब्रह्मदत्त नामक अति प्रबळ बाण दिला होता. तो त्यानें धनुष्यास जोडून धनुर्वेदांत सांगितलेल्या मुष्टी. दृष्टी. स्थिति आणि संधाना-प्रमाणें ब्रह्मास्त्राचें अभिमंत्रण केलें; त्याबरोबर त्रैलोक्य चलायमान होऊं लागलें! श्रीरामानें तो बाण आकर्ण ओढून सोडतांच रावणाच्या छातीचा भेद होऊन तो गतप्राण झाला !!!

रावण मरण पावतांच देवादिक दुंदुभि वाजवूं लागले, गंधर्वांनीं गायन केलें. अप्सरा आनंदानें नाचूं लागल्या, आकाश स्वच्छ झालें, सुखदायक वायु सुटला, सूर्य स्पष्ट दिसूं लागला. लंकेचें राज्य आपल्यास मिळेल, असा बिभीषणाचा दृढ विश्वास बसला, सुग्रीव व अंगद ह्यांसही स्वराज्याची स्थापना वाटूं लागली, वानरांनीं नभोमंडळ परिकंपित करणारा सिंहनाद केला, आणि हताश व घायाळ राक्षस आक्रंदन करीत लंकेंत गेले. बंधूच्या अकाल मरणामुळें बिभीषणासही फार वाईट वाटलें. तो विलाप करीत ह्मणूं लागला, " विद्वान व पराक्रमी बंधो, तूं अमूल्य शयनावर झोंपणारा आज धरणीवर कसा रे पडलास ? माझें हितवचन तुला

कसें आवडलें नाहीं ! तूं काम व मोहवश कसा आलास ! हाय ! हाय ! काय ही तुझी स्थिति ! आज रावणरूपी महान वृक्षास श्रीरामरूपी प्रचंडवायूनें धुळींत मिळविलें. अरेरे ! रावणरूप मदोन्मत्त हत्तीस श्रीरामसिंहानें फाडून टाकिलें. तूं अशक्त होऊन मरण पावला नाहींस; मोठ्या उत्साहानें पराक्रम करितां करितां युद्धांत गतप्राण झालास. तुजविषयीं आह्मीं शोक करणें जरी अयोग्य, तरी आमचें मन शांत रहात नाहीं. तूं देवादिकांशीं युद्ध केलेंस. परंतु तुला कधींच पराजय माहीत नाहीं. आणि आज दैवगतीनें काय विकट प्रसंग आणिला पहा ! तूं याचकांस नेहमीं संतुष्ट करीत होतास, मनास वाटतील तसे भोग भोगिलेस, चाकरांचें संपूर्ण रीतीनें उत्तम पोषण केलेंस, मित्रांचें दरिद्र दूर केलेंस, शत्रूंचा आजपर्यंत विध्वंस केलेस, तूं परम पवित्र अग्निहोत्री, प्रखरतर तपश्चर्या केलीस, मोठमोठे यज्ञ केलेस आणि सांगवेदाध्ययनही केलेंस, परंतु कालयोगानें तुला अशी दशा प्राप्त झाली. काय करणार ! "

श्रीराम बिभीषणाचें शांतवन करण्याचा प्रयत्न करीत होता. तितक्यांत रावणाच्या कित्येक स्त्रिया आक्रांत करीत रणभूमीवर आल्या; आणि रावणाला आलिंगून मोठमोठ्यानें रडूं लागल्या. " दैवगति चमत्कारिक खरी. ज्या रावणाला सुरासुर नागादिकांचें अगदींच भय नव्हतें, त्याला आज मानवापासून भय उत्पन्न झालें. दानव व यक्ष-राक्षसांस जो अवध्य तो आज मनुष्याच्या हातून वध पावला. हितचिंतक व

खऱ्या मित्राच्या सत्य गोष्टींकडे जो लक्ष्य देत नाहीं, त्याला असेंच फळ मिळतें." मंदोदरी रडत रडत ह्मणूं लागली "त्रैलोक्यविजयी प्राणनाथांचा यःकश्चित वनचरांनीं कसा सर्व नाश केला. मला वाटतें असें घोर कर्म श्रीरामाच्या हातून होणार नाहीं. प्रत्यक्ष काळच रामरूपानें आला असेल! श्रीराम साक्षात् परमेश्वर असावा. कारण, परमेश्वराशिवाय दुसऱ्याच्या हातून माझ्या प्रीयकराचा अंत कधींच होणार नाहीं. पापाच्या-परिपाकाचा समय येतो तेव्हांच त्याचें फळ मिळतें. चांगलें करील त्याला चांगलें आणि वाईट करील त्याला वाईट फळ मिळतें; हा नियम अबाधित आहे. कोणत्याही प्राण्याचा निमित्ताशिवाय मृत्यु येत नाहीं. अशी पद्धतीच आहे. त्याप्रमाणें तमच्या मरणास सीता हेंच निमित्त झालें. हाय! हाय! माझी अशी स्थिति होईल असें मला कधींच वाटलें नव्हतें. मी आज सर्व सुखभ्रष्ट झालें. मयदानवासारखा पिता, रावणासारखा भर्ता, आणि इंद्रजितासारखा पुत्र असून आज मी हीनभाग्य झालें! नाथ, मला तुह्मी आपल्याबरोबर न्या. पतिव्रता स्त्रियांचे अश्रु, भावि अनर्थकारणरूप होऊन जमिनीवर पडतात; असें जे ह्मणतात, तें खरें. परम प्रख्यात पुरुष जर निंद्य कर्म करूं लागला, तर त्याचे दिवस फिरले असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तुह्मी सीता चोरून आणली, तेव्हांच तुमचा काळ फिरला. सूर्याचें किरण निर्भयतेनें आज लंकेंत पडले. हें पाहून मला फार खेद होतो."

बिभीषणानें श्रीरामवचन शिरसा वंद्य करून

**रावणाचा** प्रेतसंस्कार केला; आणि त्याच्या स्त्रियांचें शांतवन करून तो पुनः **रामा**कडे आला. तेव्हां आकाशांतील देवता **सुग्रीवा**चे विचार, वानरांचें दारुण युद्ध, **हनुमाना**ची **श्रीराम**पदकमलीं श्रद्धाभक्ति व अलौकिक शक्ति, **सीते**चें पातिव्रत्य, **लक्ष्मणा**ची खरी बंधुप्रीति व पराक्रम, अतुल शक्तिवैभवसंपन्न व त्रैलोक्यविजयी **रावणा**चा वध आणि **श्रीरामां**चे अद्भुत सामर्थ्य, दृढनिश्चय, विजयश्री, गांभीर्य, सत्यप्रियता, न्यायी आचरण, दयाळुत्व, प्रसंगावधान, पितृभक्ति, इत्यादि अनेक सद्गुणांची स्तुति गात स्वस्थानीं गेल्या.

**श्रीराम** रथांतून उतरला आणि त्यानें **मातली**चा सत्कार करून त्यास ' रथ घेऊन जा ' अशी आज्ञा केली. तेव्हां **मातली** रथासह स्वर्गलोकीं गेला.

सर्वत्र शांतता झाल्यावर **श्रीराम** आपल्या सैन्यांत आला. त्यानें " **बिभीषणा**स चांगल्या थाटमाटानें व शास्त्रोक्त विधीप्रमाणें राज्याभिषेक करून ये " असें **लक्ष्मणा**स सांगितलें. तेव्हां सर्व लोक **श्रीरामा**ची फार स्तुति करूं लागले; आणि **श्रीरामा**सही आपलें वचन सिद्धीस गेलें ह्मणून आनंद वाटला. त्यानें **हनुमाना**स पाठवून **सीते**स आपल्या सैन्यांत आणविलें.

**बिभीषण सीते**स घेऊन आला असें पहातांच, **श्रीरामा**च्या अंतःकरणांत क्रोध, हर्ष व दीनता एकदमच प्रकट झाली. बराच वेळ विचार करून आनंदानें कोणतेंही चिन्ह न दाखवितां " **सीता** आतांच येथें येऊंद्या " अशी आज्ञा केली. तेव्हां, राजनीतीज्ञ **बिभीषणानें** राजरीतीप्रमाणें **घेऊन येतों** असें सांगितलें

तेव्हां **श्रीराम** म्हणाला " हे सर्व प्राणी मला बंधु-पुत्रासमान आहेत. घर, वस्त्र किंवा पडदपोशीनें स्त्रियांचें पातिव्रत्य रक्षण होतें असा अर्थ नाहीं. केवळ सदाचरण हेंच स्त्रियांस शोभादायक होय. विपत्तिसमयीं, रोगग्रस्तावस्थेंत, युद्धांत, स्वयंवरांत, यज्ञांत किंवा विवाहप्रसंगीं लोकसमुदायाच्या दृष्टीस स्त्रिया पडल्या, तरी त्यांत कांहीं दोष नाहीं. **सीता** विपत्तींत होती, तसाच मीही येथें आहें. म्हणून ती लोकांच्या दृष्टीस पडली तरी कांहीं चिंता नाहीं. तिला चालतच येथें येऊं द्या."

न जाणों **श्रीराम सीतेचा** स्वीकार करणार नसेल अथवा तिजवरील त्याचें प्रेमत्व कमी झालें असेल, अशा चिंतेंत पडलेल्या **बिभीषणानें सीतेस** पालखींतून उतरून नम्रतापूर्वक **श्रीरामासमोर** आणिलें. **रामाच्या** वचनांतून जो भावार्थ निघूं लागला, त्याचा विचार करून **लक्ष्मण, सुग्रीव** व **हनुमान** दुःखीत झाले आणि **सीता** विस्मयानें व हर्षानें **श्रीराममुखारविंद** पहात त्यासन्मुख येऊन उभी राहिली. तेव्हां **श्रीराम** प्रांजळ मनानें सांगूं लागला " रणभूमीवर मीं सर्व शत्रूंना तुझ्याकरितां संहार करून जय मिळविला. पुरुषप्रयत्नानें जितकें कांहीं करितां येण्यासारखें होतें, तितकें केलें. मीं क्रोधाचा अंत केला. शत्रूस व शत्रूंनीं केलेल्या अपमानास मीं निःसंदेह नष्ट केलें. माझा प्रयत्न सफळ झाला. आणि मीं केलेली प्रतिज्ञाही सर्वथैव सिद्धीस गेली. आतां मी सर्वप्रकारें स्वतंत्र आहें. चपलचित्त, राक्षसांनीं मी किंवा **लक्ष्मण** तेथें नसल्यामुळें तुजवर जें

संकट आणिलें, तें माझ्या पराक्रमानें घालविलें. आपला आलेला अपमान जो मनुष्य तेजोबलानें दूर करणार नाहीं, त्याचें जन्म व्यर्थ होय. समुद्रोल्लंघन, रावणमर्दन व हनुमानाचे महान पराक्रमसंपन्न प्रयत्न आज सफल झाले. आणि बिभीषणाच्या वचनपाशांतूनही मी सुटलों."

श्रीरामाच्या गंभीर भाषणांतून "मला तुझी गरज नाहीं" असा भावार्थ निघतांच सीता दुःखाश्रु गाळूं लागली. आणि श्रीरामाचें मनही तिची दीनवाणी स्थिति व लोकापवादभीति ह्या दोन्ही विचारणीय गोष्टींनीं डोलायमान होऊं लागलें. तरी पण जनापवादभीतीकडे विशेष लक्ष्य देऊन श्रीराम ह्मणाला "सीते! मला जें कर्तव्य होतें, तें मीं केलें. मी तुला आतांच स्पष्ट सांगतों कीं, ह्या युद्धाचा परिश्रम जरी स्नेही लोकांच्या सहायतेनें सफल झाला, तरी तो मीं तुजकरितां केला नाहीं. केवळ क्षत्रिय धर्माचें संरक्षण करावें, जनापवादांतून मुक्त व्हावें, आणि आपल्या परम प्रख्यात वंशास लागलेला कलंक धुऊन टाकावा इतक्यासाठींच मीं असें केलें. नेत्रविकारी मनुष्यास समोर जवळ असलेला दीप जसा प्रतिकूळ होतो, तसाच तुझ्या सदाचरणांतही मला संदेह दिसतो. जानकी, तुझ्या मनास वाटेल तिकडे तूं जा. मी मुळींच प्रतिबंध करूं इच्छित नाहीं. तुला दाही दिशा मोकळ्या आहेत. मला तुझें अगदीं प्रयोजन नाहीं. स्त्रीच्या लालुचीनें परक्याच्या घरांत राहिलेल्या स्त्रीचा स्वीकार कोणता पुरुष करील तो करो! तूं रावणाच्या दुष्ट दृष्टीनें

कलंकित झाली आहेस. मोठ्या कुलीनपणाचा महान् अभिमान धरणारा मी, तुझा कधीं अंगीकार करणार नाहीं. मी तुला निश्चयानें सांगतों कीं, तूं आपल्या दीराकडे, माहेरीं, किंवा **सुग्रीव, बिभीषण,** ह्यांपैकीं जें स्थळ तुला रुचेल तेथें रहा. जा--येथून निघ माझ्या समोर उभी राहूं नकोस. दिव्यस्वरूप व मनोहर आकृति आपल्या घरांत असतांना इतके दिवस **रावण** धीर धरून राहील असें मला वाटत नाहीं."

भर सभेंत पूर्वी कधीं न ऐकलेलें असे स्वपतीचे कठोर वाक्बाण अंतःकरणांत टोंचून **सीता** फारच दुःखित झाली. तिच्या नेत्रांतून दुःखाश्रूंचा पूर निघाला. तरी मंद स्वरानें व गद्गद कंठानें ती ह्मणाली "एखादा पामर पुरुष पामरीला जशीं रूक्ष व दारुण वचनें बोलतो, तसें तुह्मी हें काय आरंभिलें आहे ? नीच स्त्रियांच्या रीतिभातीवरून सर्वच स्त्रियांची शंका घेणें उचित नव्हे. तुह्मांला माझा पुष्कळ परिचय आहे. परंतु, तुमच्या मनांत दुष्ट शंका कां येते हें मला समजत नाहीं. दुष्ट **रावणानें** मला आश्रमांतून उचलून नेलें, ह्या कृत्यांत मला दोष देण्यापेक्षां माझ्या दैवगतीस द्यावा हें योग्य. माझें हृदय अद्याप आपल्या आधीनतेंतच आहे. अशी माझी खातरी आहे. दुसरा फार झालें तर गात्रांचें हरण करील, पण त्याला अंतःकरणाचें हरण करितां येणार नाहीं. जसें तुह्मी मला स्पष्ट सांगितलें, तसेंच मीही विचारितें कीं, असा जर तुमचा उद्देश होता, तर **हनुमानास** माझ्या शोधाकरितां पाठविलें तेव्हांच मला कां कळविलें

नाहीं? तेव्हांच जर मला तुमचा असा अभिप्राय समजला असता, तर मीं तत्क्षणींच माझें जीवित सोडिलें असतें. आणि तुह्मांलाही प्राणसंशयीं दारुण युद्धकर्म करण्याचें मुळींच कारण पडलें नसतें. तसेंच **सुग्रीव**, **हनुमान**प्रभृति तुमच्या वीरमंडळास विनाकारण परिक्लेश सहन करावे लागले नसते. तुह्मी सर्व सामान्य स्त्रीजातीकडे दृष्टि देऊन सामान्य जनांप्रमाणें मला व्यर्थ दोष देतां. माझ्या पित्याचें कुल, माझें आचरण, भक्ति व शील ह्यांकडे मुळींच लक्ष्य दिलेंत नाहीं. विवाहसमयीं मला काय वचनें देऊन पाणीग्रहण केलेंत त्याचाही विचार तुमच्या मनांत कसा आला नाहीं? हेंच मला मोठें नवल वाटतें!" **सीता** स्फुंदत **लक्ष्मणास** सांगूं लागली, "भावोजी! तुह्मी कृपा करून मला चिता तयार करून द्याल, तर तुमचे मजवर अनंत उपकार होतील. आजपर्यंत मीं जें दुःख भोगिलें, त्याला अशा प्रसंगीं हेंच सर्वोत्तम दिव्य औषध आहे. मिथ्या लोकापवाददोषानें दोषी होऊन वांचावें, असें मला वाटत नाहीं. मी आतां अग्निप्रवेश करणार."

**सीतेचें** हृदयद्रावक व निग्रही दीन वचन ऐकून **लक्ष्मण श्रीरामाकडे** पाहूं लागला. त्याच्या नेत्रचेष्टांवरून "असेंच झालें पाहिजे" असा **श्रीरामाचा**ही अभिप्राय असें **लक्ष्मणास** वाटलें. तेव्हां **लक्ष्मणानें** चिता सिद्ध केली. **श्रीराम** क्रोधाक्रांत दिसूं लागला. **श्रीरामास** प्रदक्षिणा व वंदन करून **सीतेनें** ब्राह्मण व **देवतांसही प्रणाम** करण्याकरितां हात जोडिले आणि **ह्मटलें**, "**श्रीरामापासून माझें हृदय एक क्षणही दूर**

गेलें नसेल, तरच जगताच्या पापपुण्याचा साक्षी अग्नि-नारायण माझें रक्षण करील. **श्रीराम** मला दुष्ट व दोषी समजत आहे; परंतु मी जर तशी नसेन, तर माझे केश व वस्त्र यांसही अग्नि स्पर्श न करो!" असें भाषण करीत **सीतेनें** चितेस प्रदक्षिणा केली व निःशंकमनानें अग्निप्रवेश केला! असें पहातांच सर्व लोक हाहाकार करूं लागले!!! **श्रीरामही** तो देखावा पाहून चिंताग्रस्त झाला. इतक्यांत **ब्रह्मा, रुद्र** व **इंद्रप्रभृति** देव विमानांतून सत्वर तेथें येऊन पोंचले आणि सांगूं लागले, " **श्रीरामा**, तूं **सीतेची** उपेक्षा कां करितोस? आणि आपल्या सत्यस्वरूपास कसा विसरतोस?"

**ब्रह्मदेव** असें सांगत आहे तोंच मूर्तिमंत अग्नि-नारायण सीतेला घेऊन चितेबाहेर आला. **सीतेच्या** केसाला, वस्त्रांस किंवा पुष्पांसही अग्निस्पर्श झाला नव्हता. **सीता** श्रीरामाच्या स्वाधीन करितांना अग्निदेवानें सांगितलें " **श्रीरामा**! वचन, मन, बुद्धि, किंवा दृष्टी-नेंही **सीतेनें** व्यभिचार केला नाहीं. सत्या पातिव्रत्याचा आश्रय करून हिनें **रावणास** तुच्छ मानिलें होतें. **सीता** निष्पाप आहे. तूं आनंदानें व स्वच्छ मनानें हिचा स्वीकार कर."

" **रावणाच्या** घरीं **सीता** फार दिवस राहिली; एतदर्थ जनापवाद व मनापवाद दूर करण्याकरितां तिची अशी शुद्धि करणें भाग होतें. हिची शुद्धि केल्यावांचून जर मी हिचा स्वीकार करितों, तर **श्रीराम** मूर्ख व कामी आहे, असें कोणीही ह्मणता. माझी प्रीय **सीता** व मी भिन्न नाहीं, हें कोणालाही समजतें. **सीतेचें**

संरक्षण तिच्या परम पातिव्रत्यानेंच केलें हें मलाही माहीत आहे. तिच्या मर्यादेचें उल्लंघन करण्याची **रावणाची** शक्ति नव्हती." असें ह्मणून मोठ्या आनंदानें **श्रीरामानें सीतेचा** स्वीकार करितांच देवता, वानर व राक्षसही फारच प्रसन्नचित्त झाले. **श्रीरामासही** आनंद झाला. तेव्हां **इंद्रानें** त्यास मागितलें "तूं **रावणवध** करून आह्मांस अत्यंत आभारी केलेंस एतदर्थ तुझी जी इच्छा असेल ती मांग." "तुह्मी मला प्रसन्न झालां, यामुळें तुमची जर मजवर प्रीति असेल, तर माझ्या सैन्यांतील कित्येक वानर व अस्वलें आपल्या त्रिपुत्रादिकांपासून दूर येऊन ह्या समरंगणांत गतप्राण झालीं आहेत. तीं सर्व निर्व्रण व निर्व्यथ होऊन सजीव व्हावींत. कारण, त्यांनीं माझ्याकरितां मरणाचीही पर्वा बाळगिली नाहीं. मी त्यांच्या उपकारांतून कधींही मुक्त होणार नाहीं. आणि माझी दुसरी विनंति अशी आहे कीं, जेथें जेथें वानर राहतील तो प्रदेश फलपत्र-पुष्पमूलानें व निर्मल जलाशयानें सदैव संपन्न असावा. इतकीच कृपा करा ह्मणजे झालें."

**ब्रह्मदेवानें** "तथास्तु" ह्मणतांच झोंपेंतून उठल्याप्रमाणें रणभूमीवर पडलेले वानर उभे राहिले. आणि **श्रीरामास** "आतां तूं **अयोध्येस** जा व सिंहासनाधिष्ठित हो" अशी विनंति करून देवता स्वस्थानीं गेल्या.

वनवासाची मुदत संपूर्ण होत आल्यावर **बिभीषणानें** एक दिवस राहण्याविषयीं **श्रीरामास** फार आग्रह केला. परंतु, त्यानें तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. तो त्याच्या परम स्नेहाची, सहायतेची, परिश्रमाची व अनुपम श्रद्धा-

भक्तीची प्रशंसा करून सांगूं लागला " **भरतास** लव-कर पहावें अशी माझी इच्छा आहे. तो **चित्रकूटपर्यंत** आला होता. आणि माझ्या पायांवर मस्तक ठेवून मीं वनवासास जऊं नये अशी प्रार्थना करीत होता. परंतु, मीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. तसेंच **कौसल्या, सुमित्रा, कैकयी,** व **गुहक** आणि प्रजाजनही **चित्रकूट**-पर्यंत आले होते. आणि तेही सर्व **भरताप्रमाणेंच** सांगत होते. परंतु, परमप्रीय व परमवंद्य पितृवचनास मान देण्याकरितां मी त्यांचें सांगणें अमान्य केलें. आतां त्यांना लवकर भेटावें अशी माझी उत्कंठा आहे. **पुष्पक** विमान सत्वर आण."

**श्रीरामाच्या** आज्ञेप्रमाणें **बिभीषणानें** विमान आणविलें. **श्रीरामानें** सर्व वानरांचा भवरत्नांनीं सत्कार केला. आणि सांगितलें " सैनिक वीर हो, तुम्हीं महान् मित्रकार्य केलें. आतां तिकडे जावें अशी तुमची इच्छा असेल तिकडे चला. **सुग्रीवा**, तूं अंतर्यामित्र, माझा हित-चिंतक आणि सत्यमित्र आहेस. तूंही आपलें कर्तव्य योग्य रीतीनें केलेंस. आतां तूं **किष्किंधेस** जा. **बिभीषणा**, तूं **लंकेंत** सुखानें राज्य कर. आतां देवताही तुजकडे वक्र दृष्टीनें पाहूं शकणार नाहींत. आणि मीही पित्याच्या राजधानींत जाण्याची तुम्हां सर्वांची येथेंच परवानगी घेतों."

तेव्हां **सुग्रीव, बिभीषण** व इतर वानरांनीं " आम्हीही तुमच्याबरोबर येतों. आपण सिंहासनाधिष्ठित झालां म्हणजे **कौसल्या** मातेस प्रणाम करून येऊं " अशी प्रार्थना केली. **श्रीराम** म्हणाला " जशी तुमची

इच्छा. प्राणप्रीय मित्रांसह अयोध्येंत जातांना मलाही फार आनंद होईल. चला सर्व विमानांत बसा."

पुष्पक विमान आकाशांतून चाललें तेव्हां सर्व भूभागाचा प्रेक्षणीय देखावा पाहून सर्वांस आनंदीआनंद झाला. श्रीराम. सीतेस प्रमानें सांगूं लागला "विश्वकर्म्यानें रचलेली ही लंका नगरी त्रिकुटाचलावर कशी शोभायमान होऊन राहिली आहे पहा. येथें वानरांचें व राक्षसांचें युद्ध झालें. त्यापलीकडे रावणाचा अंत्यसंस्कार झाला. कुंभकर्णास मी येथें मारिलें. नीलानें प्रहस्तास व हनुमानानें धूम्राक्षास येथेंच गतप्राण केलें. तें दूर स्थळ दिसतें तेथें लक्ष्मणानें इंद्रजिताचा संहार केला. त्याच्या आलीकडेस त्रिशिरा, अतिकाय, देवांतक व नरांतक यांचा अंत झाला. कुंभ-निकुंभ समोरच खालीं मरण पावले. मीं येथेंच मकराक्षास ठार केलें. मंदोदरीप्रभृति रावणाच्या स्त्रिया येथेंच आक्रांत करीत होत्या. प्रीये, हा सेतु पहा! येथें मीं निर्विघ्नप्राप्त्यर्थ शंकराराधना केली. सदाशिव प्रसन्न होऊन सेतिलिंग रूपानें येथेंच वास्तव्य करून राहिला. येथेंच बिभीषण आह्मांस भेटला. ही पहा सुग्रीवाची किष्किंधा नगरी." तेव्हां सीतेनें सांगितलें "सुग्रीव इत्यादि वानरांच्या स्त्रिया अयोध्येंत येतील तर मला फार आनंद होईल." श्रीरामानें विमान तेथें उतरलें. आणि सर्व वानरादिकांस सांगितलें. "तुह्मी आपापल्या स्त्रिया घेऊन सत्वर या"

आपापल्या पतींच्या आज्ञेप्रमाणें सर्व वानरी. सीता, अयोध्याराम, राज्याभिषेक व राजपत्न्यांचा

समुदाय वगैरे पहाण्याच्या उत्कंठेनें वस्त्राभूषणांनीं सजून तारेसह मोठ्या थाटानें विमानांत येऊन बसल्या. सीतेस पहातांच त्या आपसांत कुजबुजूं लागल्या "सीतेचें मुखकमळ पूर्णचंद्राप्रमाणें आहे. नेत्र कमळाप्रमाणें दिसतात. खरोखर ही सौंदर्याची पुतळी आहे. परंतु, तिला एक लहानसें शेंपूट नसल्याकारणानें सर्व सौंदर्य व्यर्थ वाटतें. आणि तेही खरेंच; ह्या जगांत सर्व सुलक्षणसंपन्न तरी कोण आहे? अहो, हिच्या अंगावर आह्मांसारखे केश नाहींत!"

**पुष्पक** विमान चालू होतांच **श्रीराम सीतेस** जन्मदात्या भूदेवीचा विस्तीर्ण व शोभिवंत भाग दाखवूं लागला. तो ह्मणाला "हा ऋष्यमूक पर्वत पाहिलास? येथेंच **सुग्रीव** आह्मांस भेटला आणि **वाळीचा** वध करण्याची प्रतिज्ञाही मीं येथेंच केली. तुझ्या वियोगानें परमदुःखित होऊन ह्या पंपा सरोवराच्या कांठीं मीं पुष्कळ विलाप व परिताप केला. येथेंच **रावणानें जटायूस** मारिलें. **रावण** तुला ज्या पर्णशाळेंतून घेऊन गेला, ती हीच पर्णशाळा. समोर दिसतो हाच महान् तपस्वी अत्रीऋषींचा आश्रम. येथेंच अत्री व अनसूया ह्यांनीं आमचा चांगला आदरसत्कार केला. हाच **चित्रकूट** पर्वत. आह्मांस येथेंच **भरत** भेटला. ही **गुहकाची शृंगवेर** राजधानी. आणि ही आपली **अयोध्या** नगरी. परमप्रिय **सीते**, तूं पुष्कळ दिवसांनीं सुखरूप येथें आलीस; एतदर्थ श्रद्धाभक्तीनें स्वदेशजननीस प्रणाम कर."

**अयोध्या** नगरीजवळ येतांच, **सुग्रीवादि** वानर व **बिभीषणादि** राक्षस मोठ्या उत्सुकतेनें उभे राहून अ-

**योध्येची** शोभा अवलोकन करूं लागले. ज्या दिवशीं चौदा वर्षें पूर्ण झालीं, त्या दिवशीं **श्रीरामानें** विमान जमिनीवर उतरलें आणि **भरद्वाजऋषीच्या** आश्रमीं जाऊन प्रणामपूर्वक त्यांस विचारिलें " मुनिवर्य ! इकडील सर्व क्षेमकुशल आहे काय? **भरत** चांगल्या रीतीनें प्रजापालन करतो ना? माझ्या तिन्ही माता कुशल आहेत ? "

तेव्हां **भरद्वाजानें** सांगितलें " सर्व ठीक आहे. बा **श्रीरामा**, भरतही तुझ्यासारखाच वेष धारण करून तुझी मार्गप्रतिक्षा करीत **नंदिग्रामीं** राहिला आहे. तूं सर्व मंडळीसह आजची रात्र येथेंच रहा; आणि उदयीक **अयोध्येंत** गमन कर. "

**भरताच्या** प्रतिज्ञेचें **श्रीरामास** स्मरण झालें. तेव्हां त्यानें **हनुमानास** सांगितलें " आम्ही येथेंच रहातों. तूं राजसभेंत जाऊन सर्वांचें क्षेमकुशल घेऊन ये. मार्गांत माझा प्रिय मित्र **गुहक** भेटेल, त्यास माझ्या आगमनाचें वर्तमान सांग. तो तुला **भरत** कुठें राहतो तें सांगेल; आणि **अयोध्येंत** जाण्याचा मार्गही दाखवील. **भरतास** मी, **लक्ष्मण** व **सीता** सुखरूप येत आहों. असें सांग. तूं येतांना त्याची सर्व स्थिति सूक्ष्म रीतीनें पाहून ये. **भरत** जरी सुपात्र आहे, तरी **कैकयीच्या** सहवासानें किंवा फार दिवस स्वातंत्र्यांत राहिल्यामुळें त्याला राज्यसुखोपभोग भोगण्याची इच्छा असेल, तर सुखानें सर्व पृथ्वीचें राज्य करूंदे. आम्ही कुठेंही तपश्चर्या करून काळ घालवूं. "

**श्रीरामाच्या** आज्ञेप्रमाणें **हनुमान** मनुष्यवेष

घरून अयोध्येकडे निघाला. तो प्रयागावरून शृंगबेरांत आला आणि गुहकास भेटून सांगूं लागला "तुझा मित्र श्रीराम, सीता व लक्ष्मणासह सुखरूप आहे. उद्यांक तो इकडे येईल." गुहकानें हनुमानास नंदीग्रामांत जाण्याचा मार्ग सांगितला; त्याप्रमाणें तो तेथें येऊन पोंहचला.

भरत श्रीरामाच्या वियोगामुळें फार कृश झाला होता. तो मृगचर्म धारण करून श्रीरामाच्या पादुकांजवळ बसला होता. तो जटाधारी, मलीनदेही, फळ मूळ खाऊन रहात असे. त्याच्या अंगावर वल्कलें होतीं. तो ब्रह्मचर्यानें रहात होता. तेथें बहुतेक मंत्रीमंडळ बसले होते. सारांश, तो साक्षात् देहधारी धर्ममूर्तीप्रमाणें दिसत असे. हनुमान त्याच्यापुढें हात जोडून उभा राहिला. व ह्मणाला " ज्या श्रीरामाच्या वियोगामुळें आपण इतका शोक करीत आहां, त्यानें आपल्यास क्षेमकुशल विचारिलें आहे. श्रीराम, रावणादि दुष्ट निशाचरांस मारून सीता, लक्ष्मण व इतर अनेक सैनिक योद्धे व महान् बलवान् मित्रांसह इकडे येत आहे. "

श्रीरामाचें कुशलवृत्त व आगमनवार्ता ऐकतांच भरताचा आनंद गगनांत मावेना! तो हनुमानास ह्मणाला. " खरोखरच तूं देव आहेस. तूं आनंदाचें वर्तमान सांगितलेंस; एतदर्थ तुला शंभर गांव व एक लक्ष गाई बक्षीस देतों. "

भरतानें विचारल्याप्रमाणें हनुमानानें श्रीरामाची इत्थंभूत हकिकत सांगितली. तेव्हां भरत, शत्रुघ्न वगैरे श्रीरामास सामोरे जाण्याची सिद्धता करूं लागले.

**श्रीरामागमनाचें** वर्तमान जिकडे तिकडे फैलावलें. लोकांनीं गुढ्या, तोरणें, ध्वज व पताका वगैरेनीं नगर शृंगारिलें. राजमार्गावर सुगंधसडे घातले. मंगल वाद्यें वाजूं लागलीं. **भरतानें श्रीरामाच्या** पादुका मस्तकावर धारण करून त्यांवर शुभ्र राजछत्र धरविलें; आणि तो पायांनींच **श्रीरामाच्या** दर्शनास निघाला. आनंदानें दाही दिशा भरल्या. **श्रीराम** विमानांतून उतरतांच **भरतानें** स्वागतपूर्वक अर्घ्यपाद्यपूजन केलें. आणि **श्रीरामानें** त्यास आलिंगन दिलें. **शत्रुघ्नानें श्रीराम, लक्ष्मण** व **सीता** यांस वंदन केलें. **श्रीराम, कौसल्या, सुमित्रा** व **कैकयी** ह्यांच्या वंद्य चरणकमलीं लीन झाला. **भरतानें श्रीरामाच्या** पादुका त्यापुढें ठेवून सांगितलें. " मजकडे अनामत असलेलें तुमचें राज्य तुह्मी सांभाळा. आज माझें जन्म व मनोरथ सफळ झाले."

**श्रीराम, लक्ष्मण, भरत** व **शत्रुघ्न** ह्यांचें बंधुप्रेम पाहून **सुग्रीव** व **बिभीषण** स्वस्थितीचा अंतरंग विचार करूं लागले. **श्रीरामानें भरताच्या** अत्याग्रहाकरितां राज्यस्वीकार केला. त्यानें व **भरत, शत्रुघ्न, लक्ष्मण** ह्यांनीं आपल्या जटा उतरल्या. त्यांनीं मंगलस्नान केलें. दिव्य अलंकार धारण केले. आणि **सुमंतानें** आणलेल्या दिव्य रथांत बसून सर्व मंडळी **अयोध्येंत** आली. **भरत** सारथ्य करीत होता. **शत्रुघ्नानें श्रीरामावर** विस्तीर्ण व शोभिवंत छत्र धरिलें. **लक्ष्मण** व **बिभीषण** चामरें ढाळूं लागले आणि मोठ्या थाटमाटानें व कडाक्यानें अत्यानंदीत झालेल्या सर्व नागरीक व सैनिक वीरांसह **रावणप्रभृति** अनेक दुष्टांचा संहार करणारा, साधु, संत

महंत महर्षींचें प्रतिपालन करणारा, परस्त्रियांस भगिनीप्रमाणें समजणारा, शरणागताचें संरक्षण करणारा, **सुग्रीव** व **बिभीषण** यांस राज्य देणारा, स्वधर्म संस्थापक, धीरोदार संपन्न, स्वदेशैकनिष्ठ, स्वतंत्रताप्रिय, वीराग्रेसर, शांतदांत दयासागर, जात्याभिमानी, धर्मप्रिय, सौंदर्याचा पुतळा जो **श्रीराम**, तो महान् समारंभानें **अयोध्येंत** प्रवेश करिता झाला. तेव्हां दुंदुभीध्वनींनें आकाश गजबजून गेलें. सर्व लोक परम श्रद्धाभक्तीनें सप्रेम व सुमनानें **श्रीरामाचा** जयजयकार करूं लागले. **श्रीरामास** अनेक आशीर्वाद देऊं लागले. **सुग्रीवाच्या** खऱ्या मित्रतेची, **हनुमानाच्या** एकनिष्ठ सेवकतेची, **बिभीषणाच्या** सहाय्यतेची व वानरसेनेच्या प्रबलतर पराक्रमाची सर्व जन स्तुति करूं लागले.

**भरतानें**, **सुग्रीवादिकांच्या** स्थलाची सर्व व्यवस्था उत्तम ठेविली. चतुःसमुद्र व पंच नद्यांचें पवित्रोदक आणविलें. **शत्रुघ्नानें** इतर सर्व सामग्री सिद्ध केली. आणि **वसिष्ठ**, **वामदेव**, **जाबाली** व **काश्यप** इत्यादि अनेक ऋषि-मुनि-ब्राह्मणांनीं **श्रीरामास सीतेसह** मणिरत्नमय राज सिंहासनावर बसवून राज्याभिषेक केला. तेव्हां **शत्रुघ्न** राजछत्र घेऊन उभा राहिला. **सुग्रीव** व **बिभीषण** ह्यांनीं चामरें धरिलीं. इंद्रादि अनेक देवांनीं **श्रीरामास** दिव्याभरणें पाठविलीं. **गंधर्व** मंजुल आनंद गीतें श्रद्धाभक्तीनें गाऊं लागले. **अप्सरा** मनोरम नाचूं लागल्या. **श्रीरामानें** पुष्पक विमान **कुबेराकडे** पाठविलें. **ब्राह्मणांस** लक्षावधि गाई, घोडे व अपार संपत्ति दान दिली, मंत्रीजनांस अमोल्य वस्त्रभूषणें दिलीं. **सुग्रीवास** दिव्य

मणीमाळा दिली. अंगदासही अनेक दिव्यालंकार दिले. पौर्णिमेच्या चंद्रासारख्या मोत्यांचा पुष्कळ मोलाचा एक सुंदर हार श्रीरामानें जानकीच्या कंठांत घातला, आणि म्हटलें. "प्रिये, ज्यावर तुझी प्रीति असेल, आणि ज्यानें तुजकरितां अश्रांत श्रम केले असतील, त्यास तूं हा हार द्यावास असा माझा हेतु आहे." प्रिय पतीच्या आज्ञाप्रमाणें सीतेनें तो बहुमोल हार हनुमानाच्या कंठांत घातला. सर्वांस श्रीरामानें अमोल्य वस्त्राभरणें दिलीं. आणि सर्वांचा फारच उत्तम सत्कार केला.

श्रीरामाचा राज्याभिषेकमहोत्सव अत्यानंदानें व सन्मानानें पाहून सुग्रीवप्रभृति वानरगण किष्किंधेस गेला. बिभीषण वगैरे राक्षस लंकेस गेले. श्रीराम सिंहासनारूढ होतांच त्यानें भरतास युवराज्याभिषेक केला. श्रीराम यथान्याय प्रजापालन करूं लागला. श्रीरामाच्या नीतिसंपन्न राज्यांत रोगभय नव्हतें. अपराधाचें नांव ऐकूं येत नसे. सर्व जनांची स्वधर्मावर प्रीति असे. सर्व लोकांत स्वदेशाभिमान मूर्तिमंत वास्तव्य करीत होता. श्रीरामाची सर्व प्रजा स्वतंत्रताप्रिय व राजनिष्ठ असे. पर्जन्यवृष्टि यथाकाल होत असे. आर्यभूमाता धनधान्यसंपन्न होती. प्रत्येक मानव प्राण्यास स्वधर्माभिमान होता. श्रीरामाची सर्व प्रजा न्यायनीतीनें वागे. श्रीरामाचे मंत्रीजन स्वकार्यदक्ष, प्रजाहितचिंतक व स्वामीसेवातत्पर असत. श्रीरामाच्या राज्यांतील सर्व लोक सुखानें आनंदांत कालक्षेप करीत. सारांश, सकल सद्गुणसंपन्न श्रीरामासारखा राजा आजपर्यंत दुसरा कोणीच झाला नाहीं: आणि ह्यापुढें होईल असेंही दिसत नाहीं.

| | |
|---|---|
| ,, कमळाकर सखाराम, अंधेरी १ | ,, कृष्णाजी बळवंत नेपाळ १ |
| मे. काजी महमद हसन, सावंतवाडी. .... .... १ | ,, कृष्णाजी बळवंत चापोरा १ |
| | ,, कृष्णाजी बहीरवा औरं० १ |
| रा. कांताप्रसाद प्रेमसन उमरा. १ | ,, कृष्णाजी मंगेश हल्याळ १ |
| सौ. कावेरीबाई. तंजावर ... २ | ,, कृष्णाजी रमाकांत गुळकुगी १ |
| रा. काशिनाथ राघव, कानिवा. २ | ,, कृष्णाजी विठ्ठल वर्धा १ |
| ,, काशिनाथ रामचंद्र. इंदूर १ | ,, कृष्णाजी विठुजी वाल्हें १ |
| ,, काशिनाथ वासुदेव. मुंबई २ | ,, कृष्णाजी विश्वनाथ केशोन. १ |
| ,, काशिराम खान. बिना १ | ,, कृष्णाजी विश्राम मुंबई १ |
| ,, केशव गणपत. नागपूर १ | ,, कृष्णाजी शेपो बेटगेरी १ |
| ,, केशव गोविंद, मुंबई १ | ,, कृष्णाजी संजीवी महु १ |
| ,, केशव नरहर, सेंद्री १ | ,, कृष्णा बिन लानारवा जम. १ |
| ,, केशव बळवंत, बडोदा १ | ,, कोंडाजी दुलाजी कराची २ |
| ,, केशव बापुजी, संगमनेर १ | ,, कोंडाजी विठुजी इंदुर १ |
| ,, केशवराव गणपतराव, कोल्हापूर. .... .... १ | ,, कोंडो बालकृष्ण मांजरीबु. १ |
| | ,, कोंडो राणोजी अहमदनगर १ |
| ,, केशव लक्ष्मण, कांदळगांव १ | ,, खंडेराव गणेश बेलापूर ३ |
| ,, केशव विठ्ठल, कवठें १ | ,, गणपत अण्णापा शिरशी १ |
| ,, केशव शामराव, इंदूर १ | ,, गणपतराव आनंद साकोली १ |
| ,, केशव सदाशीव, मुंबई १ | ,, गणपतराव चिंतामण इंदुर १ |
| ,, कृ. ब. नाडगौडा, बडग १ | ,, गणपतरावजी राणेराव इग. १ |
| ,, कृष्णराव नारायण, हरदा १ | ,, गणपतरावजी साहेब कोठा १ |
| ,, कृष्णराव हरी उंझा १ | ,, गणपतराव लक्ष्मण मुंबई १ |
| ,, कृष्णाजी गोपाळ, कुरोली १ | ,, गणपत विठु खर्डा १ |
| ,, कृष्णाजी तुकाराम, कारंजा १ | ,, गणेश नागोराव तेल्हारा १ |
| ,, कृष्णाजी बळवंत, पुळुग १ | ,, गणेश नारायण खात १ |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, गणेश बाबाजी आंबेगांव | १ | ,, गोविंद नरसिंह धारवाड | १ |
| ,, गणेश बाबाजी औंध | १ | ,, गोविंद बापूजी कळस | १ |
| ,, गणेश रामचंद्र [illegible] | १ | ,, गोविंद जनार्दन सोलापूर | १ |
| ,, गणेश लक्ष्मण साद[illegible] | १ | ,, गोविंद रामचंद्र बडोदा | १ |
| ,, गणेश विठ्ठल शेवगांव | १ | ,, गोविंद रामचंद्र ग्वाल्हेर | २ |
| ,, गणेश विश्वनाथ मुंबई | १ | ,, गोविंदराव कृष्णाजी मंडा. | १ |
| ,, गणेश शेणवी फोंडा | १ | ,, गोविंदराव [illegible] लो. | १ |
| ,, ग्यानु महादजी अहमद. | १ | ,, गोविंद व्यंकटेश धारवाड | ,, |
| ,, गोपाळ कृष्णराव [illegible] | १ | ,, गोविंद वासुदेव पुणें | २ |
| ,, गोपाळ जनार्दन मालेगांव | १ | ,, गोविंद विठ्ठल खडकी | ,, |
| ,, गोपाळ दत्तात्रय सांगली | १ | ,, गोविंद विनायक यादगिरी | १ |
| ,, गोपाळ दामोदर [illegible] | १ | ,, गोविंद शिवाजी धामापूर | ,, |
| ,, गोपाळदास गोविंददास भां. | १ | ,, गोविंदस्वामीभट तंजावर | ,, |
| ,, गोपाळ धोंडदेव शिरगांव | १ | ,, गंगाधर अनंत कारवार | ,, |
| ,, गोपाळ नारायण [illegible] | १ | ,, गंगाधर केशवराव कारवार | ,, |
| ,, गोपाळ नारायण [illegible] | १ | ,, गंगाराम शिवाजी मंगेशी | ,, |
| ,, गोपाळ मोरेश्वर [illegible] | १ | ,, घनश्याम बापुजी नांदगांव | ,, |
| ,, गोपाळराव [illegible] | १ | ,, घनश्याम शिवदीन अहमद. | २ |
| ,, गोपाळ रंगनाथ नाशिक | १ | ,, चतरसिंग खुशालसिंग वरखे. | १ |
| ,, गोपाळ विठ्ठल उरण | १ | ,, चिदंबर शेणा कारवार | ,, |
| ,, गोपाळसिंग आलमसिंग पं. | १ | ,, चिंतामण मोरेश्वर नागपूर | ,, |
| ,, गोविंद अमृत [illegible]गांव | १ | ,, चिन्नास्वामी क्लार्क मांडले | ,, |
| ,, गोविंद अमृत [illegible] | १ | ,, चंदीप्रसाद दुर्गाप्रसाद परंडा | ,, |
| ,, गोविंद आपा [illegible] | १ | ,, जगन्नाथ आत्माराम बीड | १ |
| ,, गोविंद कृष्ण [illegible] | १ | ,, जगन्नाथ गणेश रायपूर | ,, |
| ,, गोविंद गणेश [illegible] | १ | ,, जगन्नाथ पांडुरंग मुंबई | १ |

,, जगन्नाथ रावजी शाळामास्तर
नाचणगांव १
,, जगन्नाथ वासुदेव मायावरम ,
,, जगन्नाथ सखाराम बिझवाडा ,
,, जनार्दन अमृत ट्रांबे ,
,, जनार्दन गोपाळ निंबगांव १
,, जनार्दन यसोबा हैदराबाद ,
जयाबाई साळुबाई परमें.... ,
,, जार्ज वुइल्यम एन्ड को.
कारवार १
,, जिवाजी विनायक खानापूर ,
,, जी. आर. रंगुनकर नागपूर ,
,, जे. मुनस्वामी हिंगाजिया १
,, जोगेश्वर पांडुरंग छिंदवाडा १
,, जोगेश्वर मोतिराम बोरी १
,, जोगेश्वर विठ्ठल शंकरपूर १
,, टी. डी. पटवर्धन, बुलडाणा १
,, डी. नारायण क्यासलरॉक १
,, डोंगरासिंग बकत्यार भातो. १
,, तखेडकर सेक्रेटरी नाशीक ,
,, तामजी बापया वीरगांव १
,, त्र्यंबक तोताराम धामणगांव ,
,, त्र्यंबक नागनाथ महेश्वर ,
,, त्र्यंबक परशराम कोल्हापूर .
,, त्र्यंबक भिकाजी नागडें ,
,, त्र्यंबक भिकाजी नेर ,
,, त्र्यंबकराव गणेश मोहोळ ,
,, त्र्यंबक हरी बडोदा ,
,, तुकाराम आत्माराम आनंद ,
,, तुकाराम गणेश हुशंगाबाद ,
,, तुकाराम बगलाजी तळेगांव ,
,, तोताराम व. गोविंद लोहारे १
,, दगडुखंडुजी सेकंटग्रेड मुंबई ,
,, दत्ताजी बालकृष्ण ठाणें ,
,, दत्तात्रय नारायण वेळाछा ,
,, दत्तात्रय नारायण धारासीव ,
,, दत्तात्रय लक्ष्मण अहमदन. ३
,, दत्तात्रय लिंगो सावनूर १
,, दत्तात्रय विठ्ठल जालना ,
,, दत्तात्रय विष्णु विशाखपट्ट. ,
,, दत्तो विनायक नागपूर ,
दयाबाई शेवडे खडकी ,
,, दाजी अनंत कासगांव ,
,, दादाजी जिवन मुंबई ,
,, दामोधर दादाजी केळवें मा. ,
,, दामोधर वामन बडोदें ,
,, दामोधर विठ्ठल पियाळी १
,, दामोधर विनायक मुंबई १
,, दामोधर हरी मोहपाडा १
,, दासर भुमाजी मुंबई १
,, दासोपंत पाटील परसगड १
,, दिवड्या कान पा. खांबाळे १

| | |
|---|---|
| ,, देवेंद्र कल्लापा कालवाड १ | ,, नारायण जगन्नाथ मुंबई १ |
| ,, धोंडु मायजी ओढांगीता १ | ,, नारायण जी. गोखले मुंबई २ |
| ,, धोंडु वल्लद विठु रावढळ २ | ,, नारायण त्रिविक्रम नाशिक १ |
| ,, धोंडो आत्माराम कडगांव १ | ,, नारायण धोंडीराम पैठण १ |
| ,, नथमल दलीचंद अहमद. १ | ,, नारायण पांडुरंग उमरखेड १ |
| ,, नथु भिकाजी मजामुटवल्ली १ | ,, नारायण भवानी मुंबई १ |
| ,, नथु लक्ष्मण भिलमा १ | ,, नारायण रघुनाथ पांम्रड १ |
| ,, नरमनगौडा लिंगनगौ. होसू. १ | ,, नारायण रघुनाथ जैनापूर १ |
| ,, नरसिंगराव पांडुरंग सीवणी १ | ,, नारायण रामचंद्र इंदूर १ |
| ,, नरसो रामचंद्र बागलकोट १ | ,, नारायणराव आनंदराव सुंडी १ |
| ,, नरहर गणेश सालु १ | श्री. नारायणराव जहागीरदार हैद्राबाद १ |
| ,, नरहर गंगाधर इंचलकरंजी १ | |
| ,, नरहर बाळाजी हरदा १ | रा. नारायण लक्ष्मण हैदराबाद १ |
| ,, नरहर मल्हार सीवणी १ | ,, नारायण वासुदेव इंडी १ |
| ,, नागेश विनायक बडोदा १ | ,, नारायण विष्णु अकलुज १ |
| ,, नागोराव मास्तर नागपूर १ | ,, नारायण विष्णु कोल्हापूर १ |
| ,, नागोराव मारुती सिरसगांव १ | ,, नारायण सखाराम मुंबई १ |
| ,, नानाजी महिपतजी सातारा १ | ,, नारायण हरगोविंद कुमठी १ |
| ,, नानाजी विठ्ठल यावल १ | ,, नारो कृष्ण वाई १ |
| ,, नामदेव तुकाराम चितगांव | ,, नारो हरी मुरूड १ |
| ,, नारायण आबाजी मुंबई १ | ,, निळकंठ गणेश अंजनगांव १ |
| ,, नारायण केशव बोसाळे १ | ,, निवृत्तीदासबुवा पुजारी आ. १ |
| ,, नारायण कृष्ण राणेबेन्नूर १ | ,, परलिंगपा बमापा हलगेरी १ |
| ,, नारायण गणेश जमखंडी १ | ,, परशुराम गणेश कल्याण , |
| ,, नारायण गणेश सुपा १ | ,, परशुराम गोविंद उंबरगांव , |
| ,, नारायण गोपाळ नरसिंगपूर १ | परशुराम हरी चिपळूण , |

,, पांडुरंग आत्माराम धुळें १
,, पांडुरंग गोविंद विणगें ,
,, पांडुरंग नारायण सातारा ,
,, पांडुरंग मोरेश्वर मुंबई ,
,, पांडुरंग मंगेश खानापूर ,
,, पांडुरंग रामचंद्र तारापूर २
,, पांडुरंग रावजी पुणें ,
,, पांडुरंग हरी भायंदर ,
,, पांडुरंग हरी मुळे सातारा ,
,, पानाचंद रामचंद्र सोलापूर ,
,, पी. टी. शिवराव मालेबेन्नूर १
,, पुंडलीक पांडुरंग असोळणें ,
,, पुरुषोत्तम एकनाथ माटुंगी ,
,, पुरुषोत्तम माणकु किन्नर १
,, पुरुषोत्तम विनायक खांडवा ,
,, पृथ्वीगीर हरीगीर यवतमाळ ,
,, प्रल्हाद बळवंत धामणगांव ,
,, प्रल्हाद रावजी विजापूर ,
,, प्रल्हाद सखाराम साजलपूर ,
,, पेस्तनजी रतनजी दापोली ,
,, पेस्तनजी होरमसजी शहादा ,
,, पंढरीनाथ विनायक नांदेड ,
,, बकतावरसिंग राजारामसिंग अहमदाबाद. .... .... ,
,, बसंतराव किसनराव निंभोर १
,, बळवंत काशिनाथ हरदा ,

,, बळवंत गोपाळ चिकोडी ,
,, बळवंत गोपाळ चांदणी ,
,, बळवंत गंगाधर मुंबई १
,, बळवंत जगदीश भुसावळ ,
,, बळवंत रामचंद्र मिरज २०
,, बळवंतराव आबा कोल्हापूर १
,, बळवंतराव आबाजी बडोदें ,
,, बळवंतराव आर. कराचीकर मुंबई ,
,, बळवंतराव गोविंद इंदूर ,
,, बळवंतरावजी करंदीकर पु. ,
,, बळवंतराव रामचंद्र बडोदा ,
,, बळवंत विठ्ठल कोल्हापूर ,
,, बळवंत सखाराम भंडारा ,
,, बापुजी गोविंद डिहीका ,
,, बापु देवीदास शेगांव ,
,, बापु पांडुरंग आकोला ,
,, बापुरावजी मास्तर हरदा ,
,, बापु सदाशिव बऱ्हाणपूर ,
,, बाबाजी कृष्णाजी कापशी ,
,, बाबाजी गणेश मुंबई १
,, बाबु नारायण बेळगांव १
,, बाबुराव अनंत वर्धा १
,, बाबुराव बळवंत कडी १
,, बाबुराव भिकाजी अरनाळा १
,, बाळकृष्ण गोविंद तळेगांव १

,, बाळकृष्ण कानोबा सर्जेकोट १
,, बाळकृष्ण नरहर अहमदन. १
,, बाळकृष्ण बापु, मुंबई १
,, बाळकृष्ण महादेव निफाड १
,, बाळकृष्ण रामचंद्र राजापि. १
,, बाळकृष्ण लक्ष्मण भारवाड १
,, बाळकृष्ण विनायक आळंद १
,, बाळकृष्ण हरसेट संगमेश्वर १
,, बाळाचार्य बसापा ब्रह्मवर्त ४
,, बाळाजी धोंडीबा कनीगम. १
,, बाळाजी नानाभाई मुंबई १
,, बाळाजी बिन आबाजी जव. १
,, बाळाजी येशवंत मुंबई १
,, बाळाजी शेणो मंगळुळी १
,, बाळाजी श्रीनिवास मनगो. १
,, बाळाबाई अनंदराव मुंबई १
श्री. बाळासाहेबपंत औंध. १
रा. बी. एम. काकडे मंडाले १
,, बी. एन्. मोदी नगपत्नीपंत १
,, बी. [illegible] अमरा. १
,, बी. बी. देशपांडे सोलापूर १
,, बुद्धराव किसनराव नागपूर १
,, बेंडो गुणराव गुडम १
,, भाविकराव अमृतराव बडोदें १
,, भगवंत शिवराम मवार १
,, भगवानदास फत्तेचंद न्हावरें १
,, भगवानदास दिक्षीत जलालखेडा .... १
,, भाऊ अनंत कळवण १
,, भाऊ गणेश अक्कलकोट १
,, भाऊ बरडे भंडारा १
,, भास्कर सखाराम अमरावती १
,, भिकाजी लक्ष्मण पथरोट १
,, भिकु अनंत असोळणें १
,, भिमाजी परशराम तोरगल १
,, भिवा रामजी मुंबई १
,, भुमया शिवया मुंबई १
,, भैरव बापु बनारस १
,, मनोहर विष्णु अमळनेर १
,, मल्काजी रावजी गरग १
,, मल्लया व्यंकटेश नवसरी १
,, मल्हार गजानन अलीबाग १
,, मल्हारराव माधव ग्वाल्हेर १
,, महादेव गोपाळ पन्हाळा १
,, महादेव रामचंद्र मुंबई १०
,, महादेव विनायक नाशिक १
,, माहदेव सदाशीव शिमोगा २
,, मार्तंड गोपाळ सुरत १
,, मार्तंड पांडुरंग बडगांव १
,, मार्तंड लक्ष्मण आकोला १
,, माधव विष्णु वऱ्हाड १
,, माधवराव गोविंद बिलासपूर १

’, माधवराव भास्कर मुंबई १
’, मारुती कृष्ण मुर्तीजापूर ,,
’, मारुती गुरसिद्ध विटें १
’, मारुती नारायण पुणें ,,
’, मुरारराव कृष्णाजी मुंबई ,,
मे. मुल्लु बुटलर एडन ,,
रा. मेघाणा पापय्या अहमदनगर १
,, मेजर रामसिंगजी इंदूर ,,
,, यशवंत अनंत मुंबई १
,, यशवंत गणेश पटण १
,, यशवंत गोविंद बाळापूर १
,, यशवंत रामचंद्र सागर १
,, यशवंतराव रघुनाथ कसवण १
,, यसबा पाटकोबा कळंब १
,, रघुनाथ आत्माराम टांक १
,, रघुनाथ बाळकृष्ण शिंकद. १
,, रघुनाथ भिमाजी इंदूर १
,, रघुनाथराव गोपाळ अत्री १
,, रतनचंद गंभीरमल पाचोरा १
मे. रहिमान शमशोद्दीन रोण १
रा. राघवेंद्र पुरुषोत्तम धारवाड १
,, राघवेंद्र शिद्दो कित्तूर १
,, राजीव पंपेश्वर गदगबेटगेरी १
श्री. राजे काशीराव शंकरराव मालेगांव .... .... १
श्री. राणीसाहेब सावंतवाडी १

रा. राणोजी मुनाजी कुटरें १
,, रामकृष्ण माणीकजी मुंबई १
,, रामकृष्ण लक्ष्मण खिरपुरी १
,, रामकृष्ण लक्ष्मण मुंबई ,,
,, रामकृष्ण वासुदेव राजनांद. १
,, रामकृष्णासिंग ठाकूर मालगुजार मांडगांव ,,
,, रामचंद्र कणीराम झरेगांव १
,, रामचंद्र कृष्ण कोल्हापूर ,,
,, रामचंद्र c/o ममताबाई अ.न. १
,, रामचंद्र गोविंदराव कुलाबा १
,, रामचंद्र चिंतामण कोल्हापूर २
,, रामचंद्र दामोधर केळवें मा. ,,
,, रामचंद्र नारायण मुंबई ,,
,, रामचंद्र भगवंत चिकोडी ,,
,, रामचंद्र भास्कर अंकलखोप ,,
,, रामचंद्र महादेव सोनगड १
,, रामचंद्र मोरेश्वर कणकवली १
,, रामचंद्र मोरेश्वर छिंदवाडा १
,, रामचंद्र येशवंत वसई ,,
,, रामचंद्रराव सिन्नलर आगर १
,, रामचंद्र लक्ष्मण परतवाडा १
,, रामचंद्र विष्णु वरखेड १
,, रामचंद्र विष्णु कराची १
,, रामचंद्र शाबाजी बोबरवाडा १
,, रामचंद्र सदाशिव वेणगांव १

,, रामचंद्र हरी बडोदा १

,, रामचंद्र हरी उमेळा १

,, रामचंद्र हरी शिरोळ १

,, रामजीपंत सालपेकर १

,, रामभाऊ बाबाजी भिवंडी १

,, रामय्या धर्माजी मुंबई १

,, रामय्या बापु चिखली १

,, रामराव दिवे धारवाड १

,, रावजी आबाजी कटकोळ १

,, रावजी गणेश मुंबई १

,, लक्ष्मण गणेश गदग १

,, लक्ष्मण बळवंत गुंजी १

,, लक्ष्मण महादेव बेळगांव १

,, लक्ष्मण शिवराव टाकरखेड १

,, लक्ष्मण हरी इंदूर १

,, लालशंकर उ.शंकर अ. बा. १

,, लिंगो प्रभाकर धारवाड १

,, वामन केशव पळसखेड १

,, वामन कृष्ण सातारा १

,, वामन त्रिंबक चित्तागांग १

,, वामन नारायण सातारा १

,, वामन मार्तंड मानवड १

,, वामन राजाराम चिंचवड १

,, वामन शंकर मोरवी १

,, वामन सिताराम अकोला १

,, वासुदेव आत्माराम मेहसाना १

,, वासुदेव जनार्दन मिरज १

,, वासुदेव नरहर यवतमाळ १

,, वासुदेव भगवंत मलकापूर १

,, वासुदेवरावजी अण्णा पुणेकर बेळगांव १

,, वासुदेव लक्ष्मण मुंबई १

,, वासुदेव विनायक नागपूर ४

,, वासुदेव विश्वनाथ खानापूर १

,, वासुदेव विष्णु बिना १

,, वासुदेव विष्णु सातारा १

,, विठ्ठल तात्या बार्शी १

,, विठ्ठल तानाजी देवरूख १

,, विठ्ठल दयाराम धारवाड १

,, विठ्ठल मोरेश्वर इगतपुरी १

,, विठ्ठलराव वकील गुलबुर्गा १

,, विठु खंडुजी जांभुळ १

,, विठोजी माधवराव मुंबई १

,, विद्याधर श्रीकृष्ण पंचमढी १

,, विनायक अनंत बुलढाणें १

,, विनायक गणेश इंदूर १

,, विनायक गोविंद मुंबई १

,, विनायक विश्वनाथ मुंबई १

,, विनायक विष्णु आटपाडी १

,, विनायक सखाराम वजी. १

,, विश्वनाथ मंजितराव लोणार १

,, विश्वनाथ रघुनाथ पिंपळगां. १

,, विश्वनाथ विनायक जमखिं. १
,, विष्णु काशीनाथ रत्नागिरी १
,, विष्णु कृष्ण अंकलेश्वर १
,, विष्णु परशराम राजापूर १
,, विष्णु बापु मुंबई २
,, विष्णु बाबाजी मालेगांव १
,, विष्णु भगवंत आंवळी १
,, विष्णु रमाकांत नगर १
,, विष्णु रामकृष्ण पैठण १
,, विष्णु रामचंद्र मुंबई १
,, विष्णु लक्ष्मण सातारा १
,, विष्णु व्यंकाजी शहादें १
,, विष्णु वामन रौपेठणी १
,, विष्णु वासुदेव इंदूर १
,, विष्णु विठ्ठल आजरें १
,, विष्णु श्रीनिवास अमरावती १
,, व्ही. बी. लगाटे सांगोला १
,, व्ही. डी. दातार सोलापूर १
,, व्ही. के. क्लार्क झांशी २
,, व्ही. के. द्रवीड सातारा १
,, व्यंकट नरसो रायचूर १
,, व्यंकटेश आपाजी गोकाक १
,, व्यंकटेश कोन्हेर मुळभावी १
,, व्यंकटेश बचापा पौड १
,, व्यंकु बाळुजी मुंबई १
,, व्यं. वा. जायदे हजारमाची १
,, व्यंकाजी गणेश मुद्देबीहाळ १
,, शांताराम नारायन बमई १
,, शामराव खंडेराव बंभा[illegible] १
,, शामराव रामचंद्र गोहद १
,, शिवबकस चतुर्भुज पुणें १
,, शिवराम गंगाधर याकळी १
,, शिवशंकरलाल नंदुरबार १
,, शेषगीर बाबणा धारवाड १
,, शंकर केशव मलकापूर १
,, शंकर गोपाळ उरई १
,, शंकर गोपाळ नागपूर १
,, शंकर गंगाधर वाकला १
,, शंकर जनार्दन भामनेरी १
,, शंकर नारायण सांवसा १
,, शंकर भगवंत मंडपूर १
,, शंकर महादेव [illegible] १
,, शंकरराव गंगाधर बडोदा १
,, शंकरराव नारायण कुंबरी १
,, शंकरराव नारायण हंडिया १
,, शंकरराव रामजी सौंदत्ती १
,, शंकर विठ्ठल बेळगांव १
,, शंकर विष्णु बडोदा १
,, शंकर श्रीकृष्ण धुळा १
,, श्रीकुमार शंकर पातूर १
,, श्रीधर गणेश मुरबाड १
,, श्रीधर बी. ग्वाल्हेर १

,, श्रीधर विष्णु नागपूर १

,, श्रीनिवास नारायण धारवाड .... .... ४

,, श्रीनिवास रंगराव नळदुर्ग १

,, श्रीनिवास व्यंकटेश सिरोंची १

,, श्रीनिवास विनायक हुबळी १

,, श्रीपत विष्णु हैदराबाद १

,, श्रीपाद नारायण जायगांव १

श्रीमद्वरदेंद्रतीर्थस्वामी काशीमठ मंजेश्वर १

,, सखाराम तुकाराम धनोडी १

,, सखाराम महादेव वाई १

,, सखाराम मोरोबा पुणें १

,, सखाराम राघोबा भंडारा १

,, सखाराम रामचंद्र रहिमतपूर १

,, सखाराम लक्ष्मण नागोठणें १

,, सदानंद निळाजी इगतपुरी १

,, सदाशीव आडकू नागपूर १

,, सदाशीव जनार्दन वऱ्हाड १

,, सदाशीव निळकंठ चावडा १

,, सदाशीव पंढरीनाथ मुंबई १

,, सदाशीव रामचंद्र हैदराबाद १

,, सदाशीव लक्ष्मण झांशी १

,, सदाशीव विश्राम मुंबई १

मे. सय्यद अमीर ओतर १

मि. साम्युअल आयझाक ठाणें १

रा. सितारामभट पुराणीक कोल्हापूर १

,, सिताराम राजाराम संखेडा १

,, सिताराम लक्ष्मण पुणें १

,, सिताराम लक्ष्मण रायपूर २

,, सिताराम विनायक मालवण १

,, सी. व्ही. वैद्य उज्जयनी १

,, सुबाजी सुब्बाचारी मंजगुणी १

,, सेक्रेटरी ऐक्यवर्धक समाज यवतमाळ .... १

,, सेक्रेटरी सुखवर्धक नागपूर १

,, सेक्रेटरी ने. लायब्ररी कोल्हापूर .... .... १

,, सेक्रेटरी लायब्ररी नांदेड १

,, सेक्रेटरी हनुमंत लायब्ररी अड्याळ .... .... १

,, सोनु अपाजी इलीचपूर १

,, संतु गणुजी कुलाबा १

,, संभाजीराव बाबुराव ग्वालेर १

,, हणमंत कृष्ण बागलकोट १

,, हणमंत पुंडलीकभट अंको. १

,, हणमंतराव विजापूर १

,, हणमंत रेवापा उमरखेड १

,, हय्यतखान सुभेदार १

,, हरी गणेश कुरुंदवाड १

,, हरी जोमा मुंबई १

,, हरी दाजी मुंबई .... १

,, हरी नारायण ....
बागलकोट .... १

,, हरी भगवंत देवळाली १

,, हरी रावजी मुंबई १

,, हरी विठोबा हरदा १

,, हरी विष्णु खानापूर

,, हिराचंद नंदराम........
बऱ्हाणपूर

,, हिरालाल नवलराम....
एरंडोल

,, हिरु पेमाजी रिसवुड

---